


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**



# नवभारत

वर्ष ५८ । अंक २ । नोव्हेंबर २००४












अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५८। अंक २। नोव्हेंबर २००४
आश्विन-कार्तिक, शके १९२६
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.






**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका






# नवभारत

नोव्हेंबर २००४

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

अनुक्रमणिका






# आर्यांचे कूटप्रश्न आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर

**प्रा. देवेन्द्र समाधान इंगळे**

वंशवादावरील विश्वास हा संकुचित राष्ट्रवाद आहे, ते अपरिपक्वतेचे लक्षण आहे, तसेच ते अनुभवहीनता आणि एकंदरीत बौद्धिकदृष्ट्या कमजोर असलेल्या व्यक्तिमत्वाचे लक्षण आहे – बर्ट्रांड रसेल'

– १ –

आर्यांच्या कूटप्रश्नांवर सुमारे दोनशे वर्षांपासून सातत्याने वाद-प्रतिवाद आणि चर्चा सुरुच आहे. प्रामुख्याने 'आर्यवंश', 'आर्यांचे मूळवसतिस्थान' आणि 'आर्य आक्रमण' हे सिद्धांत या चर्चेत केंद्रस्थानी असतात. या विषयाचे कमालीचे राजकीयकरण झाल्याने इतिहासलेखनाच्या क्षेत्रात या वादाने एखाद्या संघर्षभूमीचे रुप धारण केले आहे. अत्यंत वादग्रस्त असलेल्या या विषयासंबंधी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे स्वतःचे एक सुस्पष्ट आकलन होते. त्यांची स्वतःची एक स्वतंत्र भूमिका होती. तर्कसुसंगत आणि विज्ञाननिष्ठ दृष्टिकोणातून त्यांनी आपली भूमिका निश्चित केली होती. खरे म्हणजे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी या विषयावर स्वतंत्रपणे व सलग असे लेखन केलेले नाही. 'हू वेअर दी शूद्राज' मध्ये शूद्रांचा ऐतिहासिक शोध घेत असतांना त्यांनी आर्यांच्या कूटप्रश्नांविषयी अनुषंगिक स्वरुपाची चर्चा केली आहे, तरीही त्यांची भूमिका इतिहासलेखनशास्त्राच्या दृष्टीने अत्यंत मौलिक आणि उद्‌बोधक आहे. प्रस्तुत निबंधात त्यांच्या भूमिकेची संगतवार आणि सूत्रबद्ध मांडणी करण्याचा प्रयत्न केला आहे. स्वार्थी राजकीय हेतूने प्रेरित होऊन काही मंडळींनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भूमिका विपर्यस्त स्वरुपात मांडण्याचे प्रयत्न मोठ्या प्रमाणावर चालविले आहेत, त्याचाही परामर्ष इथे घेतला आहे. त्या बरोबरच ऐतिहासिक दृष्टिकोणातून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भूमिकेचे महत्त्व अधोरेखित करण्याचाही हा एक अल्पसा प्रयत्न आहे.

अवेस्ता ग्रंथातील 'airiya' आणि ऋग्वेद संहितेतील 'Arya' या संज्ञा समजुन घेतांना १९व्या शतकात युरोपातील काही प्राच्यविद्याअभ्यासकांनी 'भाषा' आणि 'वंश' यांची गल्लत केली. त्यांनी समान भाषा बोलणाऱ्या या लोकसमूहांच्या आधारे 'आर्यवंश सिद्धांत' रचला. तो वस्तुतः एखादा मानववंश नव्हे तर 'आर्यन भाषिकांचा लोकसमुह' होता. अगदी १९व्या शतकाच्या आरंभापासून जर आजही 'भाषा' आणि 'वंश', यांची सरमिसळ करून अनेक अभ्यासकांनी अशी गल्लत केलेली दिसते. खरे म्हणजे 'भाषा' आणि 'वंश' यांना एकच मानता येत नाही. कारण भाषा ही मानवाची 'सांस्कृतिक आविष्कृती' आहे. तर 'वंश' ही शरीरशास्त्रीय, जैविकउत्पत्ती आणि समान अनुवांशिक वारशाशी निगडित असणारी बाब आहे. तसे पाहता सुरूवातीपासूनच 'आर्यवंश' ही संकल्पना प्रामुख्याने बौद्धिक आणि शारीरिकदृष्ट्या सर्वश्रेष्ठ मानवसमूहाचा निर्देश करण्यासाठी अतिशय अशास्त्रीय दृष्टिकोनातून वापरण्यात आली. इतरांपेक्षा स्वतःचे वांशिकश्रेष्ठत्व दर्शविण्यासाठी किंवा प्रस्थापित उच्चस्थान टिकविण्यासाठी हा 'सिद्धांत युरोपापासून भारतापर्यंत अनेकांना सोयीचा म्हणून स्वीकारार्ह वाटला. या सिद्धांताने आर्यवंशश्रेष्ठत्वाबरोबरच 'आर्यांचे मूळवसतिस्थान' आणि 'आर्य आक्रमण' सिद्धांतही प्रचारात आणला. त्याची संक्षिप्त पार्श्वभूमी अशी आहे – सेंट फ्रॅन्सिस झेविअर यांनी गोव्यात आल्यानंतर इ.स. १५४४ साली संस्कृत आणि लॅटिन भाषा एकसमान असल्याचे मत व्यक्त केले. त्यानंतर इ.स. १५८३ साली 'ख्रिस्तपुराण'चे रचयिते सेंट

---

* (प्रस्तुत निबंध इंडियन हिस्ट्री कॉंग्रेसच्या म्हैसूर येथील ६४ व्या अधिवेशनात (दि. २८ - ३० डिसें. २००३) प्राचीन भारतीय इतिहास विभागात सादर केलेल्या , 'Dr. Ambedkar on the Theory of Aryan Invasion and Original Home' या माझ्या निबंधाची संस्कारित आवृत्ती आहे. सेक्शनल प्रेसिडेंट डॉ. साहु, उपस्थितांपैकी माझे स्नेही डॉ. अशोक गायकवाड, डॉ. बी.एन. पाटील; या निबंधाविषयावर माझ्या सोबत चर्चा करणारे डॉ. उमेश बगाडे, प्रा. रणजीत परदेशी, एस.ओ. इंगळे; महत्त्वाच्या काही सुधारणा सुचविणारे प्रा. सीताराम रायकर या सर्वांचा मी आभारी आहे. – प्रा. देवेन्द्र इंगळे)

अनुक्रमणिका

टॉमस स्टीफन्स यांनी भारतातल्या अनेक भाषांचे संरचनात्मक स्वरूप हे ग्रीक आणि लॅटिन सदृश असल्याचे म्हटले होते. गोव्यात काही वर्षे वास्तव्य करणारा इटालियन व्यापारी फिलिपो सासेटी यानेही इ.स. १५८५ च्या सुमारास संस्कृत आणि युरोपियन भाषांमध्ये कमालीचे साम्य आहे याकडे लक्ष वेधले. पुढे इ.स. १७६७ साली पाँडेचरी येथील फादर गॅस्टॉंकरम् हा फ्रेंच मिशनरी लॅटिन, ग्रीक व संस्कृत या भाषांतील शब्द आणि व्याकरणाच्या साम्याचा केवळ निर्देश करून थांबला नाही तर 'समान उत्पत्तीस्रोत' हे या भाषिक साम्याचे कारण असल्याचे त्याने सुचविले. ब्रिटिश अभ्यासक प्रिचर्ड याने १८५५ साली '*Natural History of Man*' या ग्रंथाद्वारे आर्यांचा प्रादेशिक विस्तार तसेच त्यांच्यातील वांशिक साम्याचा निर्देश केला होता. त्याच्या मते, गंगेच्या मुखापासून तर ब्रिटनपर्यंत आणि स्कँडेनेव्हियाच्या उत्तरेकडील टोकापर्यंत पसरलेले समान भाषिक समूह अनुवांशिकदृष्ट्या एकाच मूळ वंशाशी संबंधित असणारी 'इंडोयुरोपियन राष्ट्रे' आहेत. त्यापैकी इंडोइराणीय शाखा विभक्त होऊन एक शाखा सिंधू नदीच्या पूर्वेस व दुसरी पश्चिमेस स्थिरावली. या दोन शाखा Ariyan आणि Aryas म्हणून परिचित आहेत. १८४८ च्या आसपास जर्मन अभ्यासक क्रिसिम लासेन यांनी Ariyan हा शब्द वांशिक अर्थाने वापरून 'आर्यवंश सिद्धांतास' अनुकूल पार्श्वभूमी निर्माण करून दिली. त्याने भारतातील उत्तरेकडील लोकांना विशेषतः उच्चजातीयांना गौरवर्णिय 'आर्य' ठरविले. आर्यवंशश्रेष्ठत्वाचे प्रतिपादन करतांना त्याने, आर्यांची म्हणून सुसंघटित, उद्योगप्रिय, सृजनक्षम, बांधेसूद, सुदृढ, बुद्धिमान अशी काही गुणवैशिष्ट्ये देखील सांगितली होती. इ.स. १८५६च्या सुमारास रॉबर्ट कॉल्डवेल यांनी तौलनिक भाषाशास्त्राच्या अभ्यासाद्वारे भारतीय समाजातील 'आर्य वंश' आणि द्रविड वंश' असा भेद स्पष्ट करून आर्य वंश सिद्धांताचा पुरस्कार केला होता. परंतु 'आर्य वंश सिद्धांताच्या' प्रचाराचे खरे श्रेय दिले जाते ते मॅक्समुल्लर यांनाच. १८५१ साली मॅक्समुल्लरने लिहिलेल्या एका निबंधामुळे "आर्यवंश" सिद्धांत लोकप्रिय झाला. 'धारदार सरळ नाकाचे आर्य' आणि 'बसक्या, मोठ्या नाकाचे किंवा Anasas म्हणजे नाक नसणारे 'रानवट लोक म्हणजे दास किंवा मूळचे रहिवासी' ही मांडणी त्याचीच. त्याचे म्हणणे होते की मध्यआशियात इंडोयुरोपियांनीच म्हणजेच आर्य वंशाची मूळ जन्मभूमी असावी त्यापैकी एक शाखा इराणमध्ये आली. तिथून पुन्हा एक शाखा विभक्त झाली व अफगाणिस्थानमार्गे उत्तर भारतात पोचली. तर इतर शाखा युरोपकडे गेल्या. भारतात आलेल्या 'इंडोआर्यन' शाखेने इथल्या मूळच्या रहिवाशांना पराभूत करून त्यांच्यावर संस्कृत भाषा आणि आर्यसंस्कृती लादली. पुढे इ.स. १८८८ साली मॅक्समुल्लरने आपली भूमिका स्पष्ट करताना आपल्या 'बायोग्राफी ऑफ वर्डस् ॲण्ड दि ओरिजिनल होम ऑफ दि आर्यन्स्' या ग्रंथात 'आर्य' ही संज्ञा वंशवाचक नसून भाषावाचक असल्याचे घोषित केले. परंतु त्या आधीच फ्रांसमधील काउंट दि गोबिनो सारख्या वंशवाद्यांनी "आर्यावंशसिद्धांत" उचलून धरला होता. आपल्या 'Essai sur linegalif des races humaines' (Inequality of Human Races) या चार खंडात्मक ग्रंथात इ.स. १८५४-५५ साली त्याने मानवजातीची तीन वंशात विभागणी केली. "आर्य" म्हणजे गौरवर्णीय असून त्यांचा वंश सर्वश्रेष्ठ व प्रभावशाली आहे. इतर वंश त्यांच्या तुलनेत गौण आहेत अशी मांडणी करून त्याने आर्यवंश सिद्धांताचा विस्तार करण्याचे काम केले.

इ.स. १८५६ सालीच इकडे भारतात कलकत्ता येथील एक ब्रिटिश डॉक्टर नॉर्मन चीव्हर्स यानेही इंग्रज व भारतीयांच्या वांशिक साम्यावर प्रकाश टाकतांनाच भारतातील 'आर्यन्स्' आणि इथल्या आदिवासी जमातींच्या वांशिक भिन्नत्वाचाही निर्देश केला होता. आर्य आक्रमण सिद्धांताचा प्रचार करणारांपैकी जॉन विल्सन याचा उल्लेख महत्त्वाचा ठरतो. इ.स. १८५८ साली प्रसिद्ध झालेल्या "*India Three Thousand Years Ago*" या ग्रंथात त्याने आर्य आक्रमण सिद्धांताचा पुरस्कार करतानाच 'आर्य विरूद्ध द्रविड' अशा संघर्षाकडे लक्ष वेधले. त्या बरोबरच त्याने भारतीय आदिवासी हे अनार्यवंशीय आहेत असे जाहीर केले. ऐवढेच नव्हे तर अनार्यांना वेगळे पाडून तो असेही म्हणाला की, "आर्यन्स आणि आपण स्वाभाविकरित्या एकाच मानववंशाचे असल्याकारणाने परस्परांचे बांधव आहोत". स्टुअर्ट पिगॉट आणि सर मॉर्टिमर व्हीलर यांनी मोहेंजोदडोच्या उत्खननात छिन्न - भिन्न, विखुरलेल्या अवस्थेत आढळलेल्या काही मानवी सांगाड्यांना आर्य आक्रमणाचा पुरातत्वीय पुरावा म्हणून जाहीर केल्यानंतर आर्य आक्रमण सिद्धांत अधिकच दृढ झाला.[२]

युरोपियन प्राच्यविद्याअभ्यासक, मानववंशशास्त्रज्ञ, इतिहासकार, भाषाशास्त्रज्ञ हिरीरीने आर्यवंशसिद्धांत, आर्यांचे

अनुक्रमणिका






परकीय मूळवसतिस्थान आणि आर्य आक्रमणाचा पुरस्कार कमी अधिक प्रमाणात करीत असताना या सिद्धांतास भारतीयांनी कसा प्रतिसाद दिला हे पाहणे उद्बोधक आणि तितकेच रंजक ठरेल. आर्यवंशश्रेष्ठत्वाशी संबंधित हे सिद्धांत भारतात प्रारंभी विशेषतः ब्राह्मणी राष्ट्रवाद्यांनी उचलून धरले. युरोपात इ.स. १८८४ साली मॅक्स मुल्लर म्हणतो की, "राजा राममोहन रॉय यांनी इंग्लंडला जेंव्हा भेट दिली ती घटना म्हणजे प्राचीन काळात विभक्त झालेल्या आर्यवंशाच्या दोन महान शाखांची पुनर्भेटच होती."[३] मॅक्स मुल्लरच्याही आधी बंगाल मधून ब्राह्मोसमाजाचे एक सुधारक केशवचंद्र सेन यांनीही तितक्याच भावविव्हल शब्दात 'आर्य बंधुत्वाची' साद दिली होती. १८७७ साली एका जाहीर व्याख्यानात ते म्हणाले, "सभ्य गृहस्थ हो – इंग्रजी राज्य भारतात अवतरले यात आम्हाला असे दृष्टीगोचर होते की, जणु काही एकमेकांपासून दुरावलेल्या बांधवांचे पुनर्मिलनच झाले."[४]

इकडे महाराष्ट्रातही चिपळूणकर – टिळकांनी आर्यवंश-श्रेष्ठत्वाचा आणि परकीय मूळवसतिस्थानाचा सिद्धांत स्वीकारला होता. विष्णुशास्त्री चिपळुणकरांनाही 'आर्यबंधुत्वाची' खात्री पटली होती. ते ब्रिटिशांना उद्देशून "आमचे पाश्चात्य आर्यबंधु" असा शब्दप्रयोग करतात.[५] मूळवसतिस्थानासंदर्भात त्यांनी युरोपियन प्राच्यविद्या अभ्यासकांचा सिद्धांत मान्य केला होता. 'आर्यलोकांचे मूळ ठिकाण युरोप व एशिया यांच्या मध्यंतरी कोठेतरी असावे... तेथून दोहोंकडे या लोकांच्या टोळ्या दूरदूरपर्यंत वसाहत करण्यास गेल्या असाव्या या पैकी एक टोळी पूर्वेकडे येऊन इराण देशात स्थाईक झाली व दुसरी पंचनद देशांत आली'[६] असे त्यांचे म्हणणे होते. त्यांच्या मते, "इराणचे मूळचे रहिवासी प्राचीन आर्यशाखेचे असून प्राचीन हिंदू व प्राचीन पारसीक यांचा पूर्वी फार निकटचा संबंध असावा हे उघड दिसते".[७] ऐवढेच नव्हे तर म. फुल्यांनी 'गुलामगिरी'त दिलेला इराणी मूळांचा इतिहास विष्णुशास्त्री चिपळुणकरांना ब्राह्मणांच्या दृष्टीने गौरवास्पद वाटतो. त्यांची भूमिका अशी होती की, "इराणातुन येऊन येवढा हिंदुस्थान ज्यांनी काबीज केला त्यांनीच जर पुढे राज्याधिकार क्षत्रियांस देऊन व वाणिज्य वैश्यांस देऊन स्वतः अरण्यवास पत्करला, तर मग त्यांच्याहून थोर व परोपकारी दुसरे कोण? ... ज्यांनी स्वतः कमावलेले राज्य आपल्या अंकित दासांस परत देऊन आपण कंदमूलांचे अधिकारी झाले, त्या ब्राह्मणांची थोरवी कोठवर वर्णावी।।"[८] या उलट दुसऱ्या बाजूने इतिहास – संस्कृतीची मीमांसा करत असताना १९व्या शतकात म. फुले, आणि दक्षिणेतीलं रामस्वामी पेरियार यांनी, 'परकीय आक्रमक आर्य ब्राह्मण' विरूद्ध 'अनार्य द्रविडादि मूळनिवासी शूद्रातिशूद्र' असे संघर्षसूत्र उभे केले होते. महात्मा फुलेंची मांडणी अशी होती – "ब्राह्मण लोक हे समुद्राचे पलीकडेस जो इराण देश आहे त्या देशांतील मूळचे राहणारे होत. पूर्वी त्यास इराणी किंवा आर्यलोक म्हणत असत... त्या आर्यलोकांनी मोठमोठ्या टोळ्या करून या देशात येऊन अनेक स्वाऱ्या केल्या... वारंवार हल्ले करून मोठा धिंगाणा केला... येथील आमच्या मूळ पूर्वजांस जिंकून आपले दास केले...."[९] रामस्वामी पेरियार यांनीही म. फुल्यांचीच भूमिका स्वीकारल्याचे दिसते. मद्रास येथे दिलेल्या एका व्याख्यानात ते म्हणतात, "ब्राह्मणलोक हे या भूमिचे मूळ रहिवासी नाहीत. ते भारतात भटकी जमात म्हणून आले."[१०]

दरम्यान दयानंद सरस्वती, योगी अरविंद व विवेकानंद यांनी ब्राह्मणी आर्यसंस्कृतीश्रेष्ठत्व प्रतिपादनाच्या हेतूने आर्यआक्रमणसिद्धांत नाकारायला सुरूवात केली होती. दयानंद सरस्वतींच्या मते "आर्य" हे संपूर्ण पृथ्वीचे सार्वभौम राज्यकर्ते आहेत. आक्रमण सिद्धांत नाकारतांना ते संस्कृत ग्रंथांची साक्ष काढतात. त्यांच्या दृष्टीने, "आर्य हे इराण मधून आलेत, त्यांनी युद्धांत इथल्या मूळ रहिवासींना पराभूत केले त्यांना दूर लोटले आणि स्वतः या देशाचे राज्यकर्ते बनले हे कोणत्याही संस्कृत ग्रंथात किंवा इतिहासात नमूद केलेल नाही."[११] योगी अरविंदांच्या मते, "आर्यआक्रमणासंबंधींचे वेदांमधील उल्लेख संख्यात्मकदृष्ट्या अगदीच अपुरे आणि अर्थबोध होण्याच्या दृष्टीने खूपच संदिग्ध आहेत. आक्रमणाचा त्यात उल्लेखच नाही. आर्य – अनार्य हा भेद वांशिक नव्हे तर सांस्कृतिक आहे."[१२] विवेकानंदांनी तर आर्यआक्रमणाचा सिद्धांत नाकारतानाच, 'अभ्यासकांनी पुढे येऊन या सिद्धांतांचे खंडन केले पाहिजे', असे आवाहन केले. ते म्हणतात, "आर्य कोठल्यातरी परकीय भूमीतुन वादळासारखे आले. त्यांनी इथल्या मूळ रहिवाशांचा प्रदेश हडप केला. त्यांचा निःपात करून भारतात तळ ठोकला ही युरोपियन पंडितांची पूर्णतः निरर्थक मूर्खपणाची बडबड आहे."[१३] पुढे वि.दा. सावरकर आणि नंतर गोळवलकर गुरुजी यांनी तर 'सर्वच हिंदूधर्मीय हे आर्य आहेत' अशी सबगोलंकर भूमिका घ्यायला सुरूवात केली. दोघांनाही आर्यत्वाचा प्रचंड अहंकार होता. सावरकरांच्या पुढील उद्धरणातूनही तो जाणवतो.

ते म्हणतात, "इजिप्शियन आणि बॅबिलोनियन संस्कृतीच्या उदयापूर्वी कितीतरी आधी धाडसी आर्यांच्या पहिल्या टोळीने सिंधूच्या तीरांवर येऊन वसाहत केली व आपला पहिला यज्ञीय अग्नि प्रज्वलित केला – आपल्या शेजारी असलेल्या जातिबांधवांपासून .... विशेषतः आर्याणांत राहणाऱ्या पारसिकांपासून आर्य जेव्हां संपूर्ण स्वतंत्र झाले तेंव्हा सप्तसिंधूच्या पार शेवटच्या सीमेपर्यंत त्यांच्या वसाहती पसरल्या...."[१४] इथे त्यांनी आर्य संस्कृती सर्वात प्राचीन असल्याचा दावा करतांनाच पर्शियनांना जातिबांधव संबोधले हे विशेष. ते म्हणतात, "वैदिक, ब्राह्मण वा चांडाल हा प्रश्न नव्हता. केवळ समान संस्कृती, समान रक्तसंबंध, समान देश आणि समान राज्यसंस्था यांचा वारसा ज्यांना लाभला होता ते ते सारेच आर्य म्हणून समजले गेले होते.[१५] .... आम्ही हिंदू सारेजण एकच आहोत आणि एक राष्ट्रही आहोत, कारण मुख्यतः म्हणजे आपण एका रक्ताचे आहोत[१६] ...... आर्यांच्या, कोलिरियनांच्या, द्रविडांच्या आणि आपल्या साऱ्या पूर्वजांच्या रक्ताच्या मिश्रणाने .... जी नवी जाती जन्माला आली तिला .... हिंदुजाती असंच नांव देण्यात आले"[१७] गोळवलकर गुरुजींनीही आर्यसंस्कृतीच्या गौरवीकरणावर भर देतांना सावरकरांप्रमाणेच 'हिंदु राष्ट्र' संघटित करण्यात अधिक महत्त्व दिले. आर्यसंस्कृतीविषयीचा आपला अहंकार त्यांनी असा व्यक्त केला – "आपण अनादी आहोत — एक प्रगत समाजजीवन, थोर संस्कृती आणि अद्वितीय समाजव्यवस्था आपण येथे उभी केली – बाकीची सर्व मानवजात म्हणजे केवळ द्विपाद प्राणी होते – आपल्या समाजाचे इतरांहून असलेले वेगळेपण व्यक्त करण्यासाठी आपल्याला – आर्य म्हणत"[१८] आर्यांचे परकीय मूळ वसतिस्थान व आर्यआक्रमण सिद्धांता-संदर्भात त्यांचे म्हणणे होते की, – "हा स्वतःचे साम्राज्यवादी उद्दिष्ट साध्य करण्यासाठी धूर्त ब्रिटिशांचा खोडसाळ प्रचार आहे"[१९] आर्यत्वाचा उघड अहंकार हिंदुराष्ट्र निर्मितीस बाधक ठरू शकतो याची त्यांना स्पष्ट जाणिव होती म्हणून ते आर्य ऐवजी हिंदू हा पर्यायी शब्द वापरावा असेही सुचवितात.[२०] आर्यांचे परकीयत्व नाकारतानाच गोळवलकरांनी त्यांना वंदनिय असणाऱ्या टिळकांच्या आर्क्टिक सिद्धांतास बाधा न पोचविण्याची दक्षता घेतलेली दिसते. टिळकांच्या सिद्धांतास अनुकूलता, दर्शविण्यासाठी त्यांनी अशी भूमिका स्वीकारली की, "फार पूर्वीच्या काळी बिहार आणि ओरिसाचा प्रदेश हा उत्तरधुव्रिय प्रदेश होता. कारण ध्रुवप्रदेश हा एकाच जागी स्थिर नसतो."[२१]

उपरोक्त विवेचनावरुन आर्य प्रश्नांच्या अनुषंगाने ब्राह्मणीराष्ट्रवाद्यांच्या भूमिकेत बदलत्या राजकीय परिस्थितीनुरुप स्थित्यंतर होत गेले असे दिसते. ब्राह्मणी राष्ट्रवाद्यांच्या भूमिकेत आलेल्या स्थित्यंतरांची काही प्रमुख कारणे अशी आहेत –

अ) म. फुलेंच्या सत्यशोधक चळवळीने आणि नंतरच्या ब्राह्मणेतर आंदोलनाने, 'आर्यवंश', 'आक्रमण' आणि 'परकीय मूळनिवासस्थानाचा' गौरव बाळगणाऱ्यांना त्याच सिद्धांताच्या आधारे आक्रमक, रानटी-हिंस्र ठरविले व शूद्रातिशूद्र ब्राह्मणेतरांना इथले मूळनिवासी घोषित करून ब्राह्मणी राष्ट्रवाद्यांच्या नैतिकतेस आणि अस्तित्वालाच एक मोठे आव्हान दिले. हे आव्हान परतवून लावण्यासाठी ब्राह्मणी राष्ट्रवाद्यांनी आर्यप्रश्नांसंबंधीच्या आपल्या भूमिकेत बदल केले.

ब) दुसरे कारण असे की, सावरकरांच्या 'पितृभू-पुण्यभू' सिद्धांतानुसार मुसलमान, ख्रिश्चनवादी अहिंदूंना अराष्ट्रीय किंवा अभारतीय ठरविण्यात आले होते. मुसलमानांना परकीय आक्रमक संबोधून राजकारणात दूर लोटायचे असेल तर स्वतःचे परकीयत्व आणि आक्रमणकर्त्यांची प्रतिमा नाकारणे क्रमप्राप्त ठरले. अशा परिस्थितीत मुस्लिमविरोधी राजकारण करतांना "आर्य आक्रमण" आणि "परकीय मूळ निवासस्थानाचा सिद्धांत" ब्राह्मणी राष्ट्रवाद्यांना गैरसोईचा वाटला.

क) ब्रिटिश राज्यकर्ते निघून गेल्यानंतर स्वतंत्र भारताने सांसदीय लोकशाही राज्यपद्धतीचा स्वीकार केला. आता केवळ खुल्या निवडणुकांच्या माध्यमातूनच राजकीयसत्ता हस्तगत करता येणार होती. या पार्श्वभूमीवर आर्यवंशश्रेष्ठत्व आणि परकीय मुळांचा उघडपणे गौरव बाळगणे अव्यवहार्य ठरले. कारण आता राजकीय सत्तासंघर्षात बहुसंख्यांक असणाऱ्या दलित, आदिवासी, ब्राह्मणेतर ओबिसी बहुजनजाती विरोधात गेल्यास ब्राह्मणांच्या सर्वंकष प्रभुत्वास मुळापासून धक्का लागणार होता. तेव्हा नवा पवित्रा धारण करण्यात आला. ब्राह्मण विरुद्ध ब्राह्मणेतर-बहुजनजाती असा संघर्ष टाळता यावा म्हणून ब्राह्मणी प्रभुत्वाखालील 'हिंदु राष्ट्रवादाच्या' नावाने ब्राह्मण-ब्राह्मणेतरांना हिंदुराष्ट्ररक्षणार्थ एका छत्राखाली संघटित होण्याचे आवाहन करण्यात आले. याचाच भाग म्हणून त्यांनी आर्यवंश-संस्कृतीश्रेष्ठत्वाऐवजी हिंदूधर्म-संस्कृतीश्रेष्ठत्वाचा पुरस्कार करायला सुरुवात केली. राजकीय गरजेपोटी आता तर त्यांनी इतिहासाचे पुनर्लेखन करण्याची मोहिमच हाती घेतली आहे. संघपरिवार यात विशेष आघाडीवर आहे. गैरसोयीच्या वाटणाऱ्या

प्रस्थापित सिद्धांतांची आणि तथ्यांची ते सवंग पद्धतीने मोडतोड करीत आहेत. आर्यांचे आक्रमण आणि परकीयत्व नाकारणे यावर तर त्यांचा विशेष भर आहेत. पण बेधडकपणे ते मूळचे इथलेच रहिवासी आहेत असा उफराटा सिद्धांत मांडून त्यांनी इतिहासाचे कमालीचे विकृतीकरण चालविले आहे.[२२] यातही एक विलक्षण बाब अशी की, संघपरिवारातील अभ्यासकांकडून आपल्या उफराट्या सिद्धांताच्या बाजूने थेट डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचीच साक्ष काढली जात आहे. संघपरिवारातील अभ्यासकांच्या भूमिकेचा मथितार्थ असा की आर्य हे मूळचे भारतीय आहेत या मताशी डॉ. बाबासाहेब आंबेडकर सहमत होते व पर्यायाने ते हिंदूराष्ट्रवादाचे समर्थन करतात असा अपप्रचार संघपरिवाराने पद्धतशीरपणे चालविला आहे.[२३] संघपरिवारातील अभ्यासकांकडून आपल्या सिद्धांताच्या पुष्ट्यर्थ डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या पुढील उद्धरणांचा वारंवार आधार घेतला जातो –

अ) भारताबाहेरुन आलेल्या आर्यांनी भारतावर आक्रमण केले असे सुचविणारा यत्किंचितही पुरावा ऋग्वेदात आढळत नाही – वैदिक साहित्याची साक्ष ही आर्यांचे मूळवसतिस्थान भारताबाहेर होते या सिद्धांताच्या विरुद्ध जाते.[२४]

ब) आर्यवंशीयांनी भारतावर आक्रमण केले आणि भारताचे मूळचे रहिवासी मानल्याजाणाऱ्या दास आणि दस्यूंवर विजय मिळविला याचा पुरावा वेदांमध्ये आढळत नाही.[२५]

उपरोक्त उद्धरणांमधून संघपरिवारास अभिप्रेत असणारा अर्थ खरोखरच प्रकट होतो काय? असा प्रश्न उपस्थित करणे सयुक्तिक ठरेल. या प्रश्नाचे उत्तर मिळविण्यासाठी आणखी काही प्रश्न विचारले पाहिजेत – आक्रमण नाकारले याचा अर्थ स्थानांतरण नाकारले असा होतो काय? ऋग्वेदात आणि वैदिक साहित्यात तसा पुरावा नाही म्हणजे इतरत्र कोणत्याही साधनांमध्ये तसा पुरावा नाही असा अर्थ होतो का? दास आणि दस्यूंना तरी स्वतः डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी भारताचे मूळचे रहिवासी मानले आहे का? या तिन्ही प्रश्नांचे उत्तर नकारार्थी द्यावे लागते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या म्हणण्याचा अर्थ एवढाच आहे की, ऋग्वेदात आणि वेदांमध्ये तसे पुरावे प्राप्त होत नाहीत. आता आर्यांच्या कूटप्रश्नांसंदर्भात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भूमिकेचे अवलोकन केले पाहिजे. त्याशिवाय त्यांच्या भूमिकेविषयी निश्चित असे भाष्य करता येणार नाही.

– २ –

भौतिकदृष्ट्या आर्यवंश ही संकल्पना अस्तित्वात तरी आहे का? असा प्रश्न उपस्थित करुन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आर्यवंशसंदर्भात प्रचलित असणाऱ्या विविध दृष्टिकोणांची चिकित्सा केली आहे.[२६] रिप्ले आणि प्रो. मॅक्समुलर यांच्यातील वैचारिक विसंगतींचा निर्देश करुन त्यांनी निःसंदिग्ध शब्दांत आपला अभिप्राय व्यक्त केला आहे तो असा – 'वेदांमध्ये आढळणारी 'आर्य' ही संज्ञा वांशिक अर्थाने मुळीच वापरलेली नाही.'[२७] तसेच 'दास आणि आर्य यांच्यातला संघर्ष हा वांशिक संघर्ष नव्हता'[२८] याकडेही त्यांनी लक्ष वेधले आहे. शब्देतिहास शास्त्राच्या प्रमेयांच्या (Philological Propositions) आधारे आर्यवंशाचे स्वतंत्र अस्तित्व सिद्ध करु पाहण्याचा बॉप यांचा प्रयत्न तर निव्वळ अनुमान आहे असे मत त्यांनी व्यक्त केले होते.[२९] त्यांचे म्हणणे असे आहे की, 'आर्य हा वंश नसून तो एक लोकसमूह होता[३०] त्यांच्या लेखी आर्यवंश सिद्धांत म्हणणे आधारहीन गृहीतक असून त्यापेक्षा अधिक काहीही नाही.[३१] याउपर त्यांची अशीही भूमिका आहे की, 'आर्यवंश सिद्धांत हा कमालीचा अविवेकी असून, तो फार पूर्वीच नष्ट व्हायला पाहिजे होता. पण नष्ट होणे तर दूरच या सिद्धांताने लोकांवर लक्षणीय अशी पकड जमविली – ब्राह्मण अभ्यासकांनी हा सिद्धांत आनंदाने उचलून धरला कारण त्यांची द्विराष्ट्रवादावर श्रद्धा आहे. ते स्वतः आर्यवंशीय असल्याचा दावा करतात व इतर हिंदूंना अनार्यांचे वंशज मानतात. कारण युरोपियनांशी नाते प्रस्थापित करुन त्यांच्यासह अहंकार आणि श्रेष्ठत्वाच्या भावनेत वाटेकरी होण्यासाठी हा सिद्धांत त्यांना मदत करतो. ...... आर्यवंश सिद्धांतास बहुसंख्य ब्राह्मण अभ्यासकांनी स्वीकृती दिल्यानेच हा सिद्धांत नष्ट झाला नाही.'[३२] आज शास्त्रीय आणि प्रगत संशोधनाच्या आधारे बहुतेक सर्वांनीच आर्यवंश सिद्धांत नाकारला आहे..... आर्यन भाषांचा गेल्या शतकातील प्रमुख अभ्यासक मॅक्स मुल्लर याने इ.स. १८८० इतक्या पूर्वीच यातील (आर्यवंश सिद्धांताची) तर्कदुष्टता सामर्थ्यपूर्ण रीतीने उघड करून दाखविली होती. हा तर्कदोष थॉमस कार्लाइल, ब्रिटीश इतिहासकार जे.आर. ग्रीन व फ्रेंच वंशवादी गोबिनो यांच्या लिखाणांतून सगळीकडे आधीच पसरला होता. मॅक्स मुल्लर लिहितो, 'मी वरचेवर हे स्पष्ट केले आहे की, मी जेव्हा आर्य किंवा आर्यन असा उल्लेख करतो तेव्हा मला रक्त, हाडे, केस किंवा कवटी

अशा गोष्टी अभिप्रेत नसतात. आर्य म्हणजे आर्यभाषा बोलणारे लोक एवढाच माझा अर्थ असतो.'[३३] रोमिला थापर म्हणतात, " 'आर्यवंश सिद्धांत' आता कालबाह्य ठरला आहे. जेनेटीक्स स्टडीज मधील अद्ययावत संशोधनाने वंशास जीवशास्त्रीय आधार असल्याचा दावा मोडीत काढला आहे. 'आर्य' या संकल्पनेद्वारा वंशाचा नव्हे तर भाषिक समुहाचा निर्देश होतो आणि एका भाषिक समूहांत अनेकानेक लोकसमूहांना सामावून घेतले जाते.' "[३४] आर.एस.एस.शी संबंधित अभ्यासक सुद्धा आता आर्यवंश सिद्धांत नाकारत आहेत.[३५] अमेरिकन मानवशास्त्रीय संस्थेच्या डिसेंबर १९३८च्यां ठरावात म्हटले होते – 'आर्यन' व 'सेमेटिक' या पदांना वंशदृष्ट्या बिलकूल महत्त्व नाही. त्यांनी फक्त दोन भाषिक कुलांचा बोध होतो.[३६] युनेस्कोच्यावतीने वांशिक समस्येचा जैववैज्ञानिक दृष्टिकोनातून वेध घेण्यासाठी वेळोवेळी संशोधक आणि तज्ञ अभ्यासकांच्या समितीचे गठन आणि चर्चासत्रांचे आयोजन करण्यात येते. १२-१८ ऑगस्ट, १९६४ रोजी मॉस्को येथील परिसंवादात जगभरातल्या संशोधक अभ्यासकांनी जो प्रस्ताव सर्वसंमतीने स्वीकारला त्यात म्हटले होते "- जगातील संपूर्ण मानवजात ही एकाच जातीची – होमोसिपीयन – आहे आणि एकाच मुळाची आहे .... अनुवंशशास्त्राच्या दृष्टीकोणातून विशुद्धवंश या नावाचीं कोणतीही गोष्ट अस्तित्वात नाही."[३७] युनेस्कोच्या वतीने जगभरातल्या संशोधक अभ्यासकांनी २६ सप्टेंबर १९६७ रोजी पॅरिस येथून प्रसिद्ध केलेल्या वंश आणि वंशभेद विषयक जाहिरनाम्यात म्हटले आहे –."वंशवादी सिद्धांतांना कसलाही वैज्ञानिक आधार नाही सध्याच्या जगातील सर्व लोक एकाच जैववैज्ञानिक जातीचे आणि एकाच मुळाचे आहेत."[३८]

आता सर्वसाधारणपणे तो एक 'भाषिक समूह' किंवा 'सांस्कृतिक समूह' होय असेच मानले जाते. या पार्श्वभूमीवर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आर्यवंशसिद्धांताच्या संदर्भात अत्यंत विज्ञाननिष्ठ दृष्टिकोन अंगिकारला आहे हे मान्य करावे लागते. अनेकदा आर्यवंशाचे अस्तित्व गृहीत धरुनच 'आर्यांचे मूळवसतिस्थान' आणि 'आर्यआक्रमणाची' चर्चा केली जाते. ती चूक लक्षात यावी यासाठी इथे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची आर्यवंशसिद्धांतासंदर्भातली भूमिका विशद केली आहे.

– ३ –

आर्यांच्या मूळवसतिस्थानासंदर्भातही डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी अशीच विज्ञाननिष्ठ आणि तर्कशुद्ध भूमिका स्वीकारली आहे. आर्यभाषा समूहाच्या आधारे आर्यवंशाचे गृहीतक उभारणे आणि त्यावरून वसतिस्थान संबंधीचे अनुमान काढणे हे त्यांना मान्य नव्हते. म्हणूनच ते असे मत नोंदवितात की, 'सामाईक मूळवसतिस्थानाची' कल्पना म्हणजे एका अनुमानाच्या आधारे दुसरे अनुमान काढण्यासारखे होय.[३९] चुकीच्या पायावर किंवा तर्कावर एखादा निष्कर्ष काढणे हे पद्धतिशास्त्राच्या कसोटीवर अशास्त्रीय ठरते असे त्यांना सुचवायचे आहे. केवळ 'आर्यवंश सिद्धांत' किंवा 'एकभाषिक समूह' या संकल्पनेच्या आधारे सामाईक अशा मूळवसतिस्थानाची कल्पना करणे शास्त्रीयदृष्ट्या गैर असले तरी त्या संदर्भात पुरातत्त्वीय पुराव्यांकडे दुर्लक्ष करता येणार नाही हे लक्षात घ्यायला हवे.

आर्यभाषासमूहाच्या सामाईक शब्दसंग्रहाच्या मदतीने बेनफे आणि गिगेर यांनी मूळवसतिस्थानाचा शोध घेण्याचा प्रयत्न केला होता. त्यांच्याही अभ्यासाची नोंद डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी घेतली आहे. बेनफेच्या मते काळ्यासमुद्राच्या उत्तरेकडील प्रदेशात तर गिगेर यांच्या मते, काळ्यासमुद्राच्या थोडे वायव्येकडे मध्य आणि पश्चिम जर्मनीच्या प्रदेशात आर्यांचे मूळवसतिस्थान असावे. दुसऱ्या एका मतप्रवाहानुसार आर्यांचे मूळवसतिस्थान कॉकेशसच्या प्रदेशात दर्शविले जाते. रिप्ले यांच्या मते त्या प्रदेशात मोठ्या प्रमाणावर वांशिक आणि सांस्कृतिक संमिश्रण झालेले असल्याने डॉ. आंबेडकरांनी कॉकेशियन सिद्धांत अमान्य केला आहे.[४०] परंतु, यासंदर्भात एक महत्त्वाचा मुद्दा लक्षात घ्यायला हवा की, रिप्ले यांच्या एकूण विवेचनाचा आधार आर्यवंशसिद्धांत हा होता रिप्लेंनी तथाकथित आर्यवंशाशी निगडीत असणारी कांही शारीरिक गुणवैशिष्ट्ये गृहीत धरली आहेत व त्या आधारे कॉकेशियन सिद्धांत नाकारला आहे तेव्हा मुळात आर्यवंशाचा सिद्धांत अशास्त्रीय म्हणून सिद्ध झाला असल्याने त्याच्या आधारे काढलेला निष्कर्षसुद्धा ग्राह्य मानता येणार नाही.

उत्तरध्रुवीय प्रदेशातील खगोलशास्त्रीय आणि वातावरणातील घडामोडींची नोंद घेवून टिळकांनी आर्यवंशाचे मूळ वसतिस्थान आर्क्टिक प्रदेशात असावे असे सूचित केले होते. टिळकांच्या आर्क्टिक सिद्धांताविषयी डॉ. आंबेडकरांचा मुख्य आक्षेप असा आहे की, घोडा हा वैदिक आर्यांचा आवडता

प्राणी आहे. त्याचा त्यांच्या जीवनाशी आणि धर्माशी अत्यंत निकटचा संबंध आहे – हा घोडा आर्क्टिक प्रदेशात आढळतो का? डॉ. आंबेडकरांनी असाच प्रश्न उपस्थित करून त्याविषयी असा निर्वाळा दिला आहे की, या प्रश्नाचे उत्तर जर नकारार्थी असेल तर 'आर्क्टिक सिद्धांत' हा अत्यंत डळमळीत होतो.[४१] डॉ. आंबेडकर हे सुद्धा लक्षात आणून देतात की, 'भारतावरील विजयात आर्यांसाठी घोडा हा प्राणी अत्यंत आवश्यक आणि महत्त्वाचा होता.'[४२] पण हा प्राणी ज्याप्रमाणे आर्क्टिक प्रदेशात आढळत नाही तसाच तो भारतातही आर्यपूर्वकालीन पुरातत्वीय स्तरांत आढळत नाही. तसा दावा मात्र संघपरिवाराकडून वारंवार केला जातो आहे. परंतु, अद्याप पर्यंत तरी त्यांना तसा निःसंदिग्ध व विश्वसनीय पुरावा देता आलेला नाही ही वस्तुस्थिती आहे. संघपरिवाराने हडप्पातील बैल आणि खेचरांना 'घोडा' बनवून कशी धूळफेक केली हे सर्वश्रुत आहेच.[४३] इतिहासकार आर.एस. शर्मा यांनी, घोड्याचा प्रवास भारतापर्यंत कशा ऐतिहासिक क्रमाने झाला हे पुरातत्वीय अभ्यासाद्वारे दर्शविले आहे.[४४] आर्यांनी भारतात प्रवेश केला तेव्हांच घोड्यांचाही प्रवेश शक्य झाला ही पुरातत्त्वशास्त्राने सिद्ध केलेली ऐतिहासिक वस्तुस्थिती आहे. डॉ. आंबेडकरांनी घोड्याच्या अस्तित्वाच्या कसोटीवर टिळकांचा 'आर्क्टिक सिद्धांत' नाकारला आहे. हीच कसोटी आर्यांचे मूळवसतिस्थान भारतात शोधू पाहणाऱ्यांच्या सिद्धांतास लावली पाहिजे म्हणजे स्वतः डॉ. आंबेडकरांनी वापरलेल्या कसोटीवरच तो सिद्धांत कोलमडून पडतो. एके ठिकाणी आर्यांच्या मूळवसतिस्थानाच्या संदर्भात डॉ. आंबेडकरांनी प्रा. डी.एस त्रिवेदा यांना उद्धृत केले आहे. प्रा. त्रिवेदा यांच्यामते, 'आर्यांनी ऋग्वेदात गंगा, जमुना, सरस्वती' या नद्यांचा आत्मियतेने उल्लेख केला म्हणून ते परकीय नसावेत.[४५] परंतु इथे एक अत्यंत महत्त्वाचा मुद्दा लक्षात घ्यायला हवा की, आर्यांनी स्थानांतरण करत असतांना आपल्याबरोबर नद्यांची नावे देखील आणली होती.[४६] याचाच अर्थ असा की, नद्यांविषयी असणाऱ्या आत्मियतेवरुन आर्य हे परकीय नसावेत असे म्हणता येणार नाही, डॉ. आंबेडकरांनी आर्यआक्रमणाचा सिद्धांत पूर्णतः नाकारला आहे. या संदर्भात त्यांनी पी.टी. श्रीनिवास आय्यंगार यांचीही मदत घेतली आहे. आय्यंगार यांच्या मते, 'आर्यांनी ऋग्वेदात स्वतःचा उल्लेख वारंवार आक्रमणकर्ते आणि विजेते म्हणून केला असता. मात्र ऋग्वेदात तसे उल्लेख फारच कमी आहेत.'[४७] ऋग्वेद संहितेचा दाखला देऊन स्वतः डॉ. आंबेडकरांनी असे स्पष्टीकरण दिले आहे की, "एका बाजूने आर्य आणि दुसऱ्या बाजूने दास किंवा दस्यू यांच्यात अगदीच तुरळक अशा चकमकी झाल्यात. हा काही कुणावर विजय प्राप्त केल्याचा किंवा त्यांना गुलाम बनविण्याचा निश्चित पुरावा होऊ शकत नाही – तो संघर्ष वांशिक नसून धार्मिक स्वरूपाचा होता. ही बाब ऋग्वेदातूनच स्पष्ट होते – अशा प्रकारे आर्यवंशीयांनी दास आणि दस्यू या अनार्यवंशीयांवर लष्करी स्वरूपाचा विजय प्राप्त केला या सिद्धांतास प्रत्यक्षात काहीच वाव नाही,"[४८] इथे हे स्पष्ट आहे की, डॉ. आंबेडकरांनी आर्य विरुद्ध दास-दस्यू यांच्यातला संघर्ष नाकारलेला नाही. त्यांनी लष्करी स्वरूपाच्या आक्रमणाच्या सिद्धांताचे खंडण केले आहे. प्राचीन भारतीय इतिहासाच्या थोर मार्क्सवादी अभ्यासिका आणि इतिहासकार रोमिला थापर यांनीही आर्यांनी मोठ्या प्रमाणावर आक्रमण केले नसल्याचे मान्य केले आहे. त्या म्हणतात,

"एखाद्या संस्कृतीचे उच्चाटन करणाऱ्या मोठ्या आक्रमणाची साक्ष देणारे पुरातत्त्वीय पुरावे अगदीच अल्प प्रमाणात उपलब्ध आहेत. इंडो-इरानियन सीमेच्या पलिकडच्या प्रदेशातून क्रमाने येणाऱ्या लहान लहान प्रमाणावरील स्थलांतरणाची – मायग्रेशनची – ही प्रक्रिया नगरे अथवा संस्कृतींचा विध्वंस करण्याइतपत मोठी नव्हती. ऋग्वेदात आपणास आर्यांचे आपापसात तसेच आर्य विरूद्ध दास अशा प्रकारच्या टोळीयुद्धांचे – चकमकींचे – संदर्भ प्राप्त होतात."[५०]

डॉ. आंबेडकरांच्या मते, आर्य आक्रमणाचा सिद्धांत हा कपोलकल्पित आहे व पाश्चिमात्त्यांच्या सिद्धांताना पायाभूत असणाऱ्या निराधार गृहीतकांना पुष्टी देण्यासाठी या कल्पित सिद्धांताची निर्मिती करण्यात आली. इंडो-जर्मन लोक हे शुद्ध आर्यवंशाचे आहेत, त्यांचे मूळनिवासस्थान युरोपात कोठेतरी असले पाहिजे, युरोपीय आर्यवंश हा सर्वश्रेष्ठ वंश आहे आणि काळा-गोरा वर्णभेद अशा वस्तुस्थितीवर आधारित नसणाऱ्या निराधार गृहीतकांना वैध ठरविण्यासाठीच आर्य आक्रमणाच्या सिद्धांताची निर्मिती करण्यात आली होती.[५१] पाश्चिमात्यांनी आपले साम्राज्यवादी हितसंबंध जोपासण्याकरिता आर्य आक्रमणाच्या सिद्धांताची निर्मिती केली असे डॉ. आंबेडकरांना उपरोक्त विवेचनातून सुचवायचे आहे. आर्यवंश-सिद्धांताचाच एक भाग या अर्थाने आर्य आक्रमणाच्या सिद्धांतानुसार, आर्यांनी आक्रमण करून इथल्या स्थानिक

अनार्यवंशियांना पराभूत केले हा भाग प्रारंभीच्या ब्राह्मणांना विशेष प्रिय वाटला. कारण त्यामुळे ब्राह्मणेतरांवरील त्यांचे प्रभुत्व टिकवून ठेवण्यास आणि न्यायोचित ठरविण्यास मदत होत होती. असा निष्कर्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी काढला.[५२]

– ४ –

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी 'हू वेअर दी शूद्राज' या ग्रंथातील 'आर्यन्स अगेन्स्ट आर्यन्स' या पाचव्या प्रकरणात आर्यप्रश्नाच्या संदर्भात अत्यंत मौलिक विवेचन केले आहे. त्यांनी एकात्म स्वरूपाच्या आर्यलोकसमूहाचे अस्तित्व नाकारून त्यांच्यातील भिन्नत्व आणि त्यांच्या स्थानांतरणांवर प्रकाश टाकला आहे. ऋग्वेदसंहितेमधील कांही ऋचांच्या आधारे त्यांनी स्पष्ट केले आहे की, 'आर्यांचे दोन भिन्न प्रकारचे लोकसमूह अस्तित्वात होते आणि ते केवळ भिन्नच नव्हते तर परस्परांचे विरोधक आणि शत्रू होते.' त्यांच्या मते ही बाब केवळ अन्वयार्थक नसून ती वस्तुस्थिती आहे व तिच्या समर्थनार्थ मोठ्या प्रमाणावर पुरावे उपलब्ध आहेत.[५३] तसे सुचविणारे कांही पुरावे सुद्धा त्यांनी दिले आहेत; ते असे – बराचकाळ पर्यंत ब्राह्मणांनी अथर्ववेदास ऋग्वेदाप्रमाणे पवित्र मानले नव्हते; — संपूर्ण ब्राह्मणी साहित्यात विशेषतः विश्वोत्पत्तीच्या संदर्भात दोन भिन्न विचारप्रवाह आहेत; – आर्यांच्या दोन समूहांपैकी एकाची चातुर्वर्ण्यावर श्रद्धा आहे तर दुसऱ्याची नाही.[५४] तसेच एकेठिकाणी ते 'वैदिक आर्य' आणि 'अवैदिक आर्य' असाही भेद करतात.[५५] 'दोन' प्रकारच्या आर्यांच्या अस्तित्वास अँथ्रोपोमेट्री आणि इतिहासात भक्कम आधार असल्याचे मत डॉ. आंबेडकरांनी व्यक्त केले आहे. त्यांच्यामते पाश्चिमात्यांचा सिद्धांत एक आर्यवंश गृहीत धरून मांडणी करतो तर 'ऋग्वेद' दोन आर्यवंशांविषयी सांगतो. इथे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना 'आर्यवंश' म्हणजे इंडो-आर्यन भाषा बोलणारे लोक अभिप्रेत आहेत हे लक्षात घ्यावे.[५६] सर हर्बर्ट रिस्ले, डॉ. गुहा आणि प्रा. रिप्ले या मानववंशशास्त्रज्ञांनी केलेल्या अभ्यासाचा आधार घेत डॉ. आंबेडकरांनी आपली भूमिका स्पष्ट केली आहे. ते म्हणतात, 'भारतीय समाज हा दोन प्रकारच्या वंशसमूहांच्या मिश्रणाने तयार झाला आहे – १) भूमध्यसागरीय वंश (मेडिटरेनियन) आणि २) अल्पाईन वंश - हे दोन्ही वंशसमूह आर्यभाषिक आहेत. या दोन्ही वंशसमूहांच्या मूळ वसतिस्थान-संदर्भात त्यांनी व्यक्त केलेला अभिप्राय अत्यंत महत्वाचा आहे. ते म्हणतात, 'मेडिटरेनियनवंशाचे मुळवसतिस्थान युरोपात भूमध्यसागरालगतच्या प्रदेशात होते असे मानले जाते.... हा वंश अल्पाईन वंशाच्या आधीच भारतात प्रवेश करता झाला असावा. प्रा. रिप्ले यांच्या मतानुसार 'अल्पाईन वंशाचे' मूळवसतिस्थान हे आशियात विशेषतः पामिरच्या प्रदेशात पश्चिमी हिमालयात कोठेतरी असावे. यामतास डॉ. आंबेडकरांनी सहमती दर्शविली आहे.[५७] या विवेचनात 'आर्यवंश' हा शब्द भाषाशास्त्रीय अर्थाने वापरला असल्याचे स्पष्टीकरणही त्यांनी दिले आहे. भारतात आर्यांचे एकापेक्षा अधिक प्रवाह आले या मतास राजेश कोचर यांनीही आपल्या ग्रंथात पुष्टी दिली आहे.[५८]

– ५ –

आर्यांच्या कुटप्रश्नांसंदर्भात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची नेमकी कोणती भूमिका होती याचे अवलोकन केल्यानंतर समोर येणारे काही निष्कर्ष सारांश रूपाने मांडता येतील –

- डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी *'आर्यवंशसिद्धांत' पूर्णतः नाकारला आहे.*
- 'आर्य' या संज्ञेद्वारा *वंशाचा नव्हे* तर 'लोकसमूहाचा' निर्देश होतो.
- *'आर्यआक्रमण सिद्धांत' अनैतिहासिक आहे.*
- आर्यांचे *आक्रमण नव्हे तर 'स्थानांतरण'* झाले.
- एकात्म स्वरूपाचा आर्यसमाज अस्तित्वात नव्हता.
- भारतात आर्यांचे एक नव्हे तर दोन प्रवाह आहेत –
  १. भूमध्यसागरी प्रदेशातील आर्य
  २. अल्पाईन आर्य
- भूमध्यसागरी प्रदेशातील आर्य हे युरोपातुन भारताकडे स्थानांतरित झाले.
- अल्पाईन आर्य हे पामिर प्रदेशातील पश्चिमी हिमालयातून भारताकडे स्थानांतरित झाले.
- *'समग्रतः आर्य हे मूळचे भारतीय आहेत'* असे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी कुठेही म्हटलेले नाही. याचा अर्थ संघपरिवाराच्या भूमिकेस त्यांची यत्किंचितही सहमती नसून संघपरिवारातील अभ्यासक डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांचा विपर्यास करताहेत.
- ब्राह्मणेतर बहुजन चळवळीतील *'पॉप्युलर'* धारणेशी देखील बाबासाहेबांची भूमिका जुळणारी नाही.

अनुक्रमणिका

उपरोक्त निष्कर्षांची सत्यासत्यता पडताळून पाहण्याची कसोटी म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या 'हू वेअर दी शुद्राज' याच ग्रंथातील इतर संदर्भ आणि तपशीलांची मदत घेता येईल. त्यांनी आपल्या या ग्रंथात आजच्या शूद्रांच्या मुळांचा शोध घेतलेला नाही. ते इंडोयुरोपियन समाजातील शूद्रांचा शोध घेतात. त्यांच्यामते शूद्र हे मूलतः आर्यच होते.[५९] परंतु शूद्र, दास आणि दस्यू हे कोणीही भारतातले मूळचे रहिवासी (aboriginals) नाहीत.[६०] याचाच अर्थ शूद्र, दास आणि दस्यू हे बाहेरून आले होते. ते सर्व 'आर्य' आहेत म्हणजे 'आर्य' बाहेरूनच आलेत असा अर्थ होत नाही का? या प्रश्नाचे उत्तर आहे – होतो. आर्यांचे मूळवसतिस्थान शोधायचे तर घोड्याच्या अस्तित्वाची कसोटी किती महत्त्वाची आहे ते स्वतः डॉ. आंबेडकरांनी स्पष्ट केले आहे. घोड्याच्या कसोटीसंदर्भात आपण मागे जी चर्चा केली आहे त्यावरुनही 'आर्य' हे बाहेरूनच भारताकडे स्थलांतरित होत आलेत हेच सिद्ध होते. दि. २८ ऑक्टोबर १९५९ रोजी लुधियाना येथे दिलेल्या भाषणातही डॉ. आंबेडकरांनी आर्य बाहेरून आल्याचा स्पष्ट उल्लेख केला आहे.[६१] आर्यांच्या कूटप्रश्नांच्या अनुषंगाने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भूमिकेचा परामर्ष घेतल्यानंतर ठळकपणे जाणवणारी बाब म्हणजे, हा प्रश्न ऐतिहासिकदृष्ट्या अत्यंत गुंतागुंतीचा आहे ऐवढे निश्चित. म्हणूनच डॉ. आंबेडकरसुद्धा या संदर्भात मान्य करतात की, 'the matter is not quite so simple as western writers have supposed'[६२] हे सर्वांनीच लक्षात घ्यावे. 'आर्य हे परकीय आक्रमक आहेत' किंवा 'आर्य हे मूळचे भारतातील रहिवासी आहेत' अशी उथळ आणि सवंग मांडणी करणे हे आजही राजकारण करणाऱ्यांना सोयीचे वाटत असले तरी ते अनैतिहासिक सिद्धांत आहेत. अशा प्रकारचे इतिहासाचे अतिसुलभीकरण डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भूमिकेशी विसंगत आहे. वस्तुतः डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी 'आर्यांचा परकीय आक्रमक' म्हणून विचार केला असता तर ते बहुजनवादी 'पॉप्युलर' राजकारणाच्या दृष्टिने अधिक सोयीचे ठरले असते; परंतु त्यांनी अत्यंत संवेदनशील सामाजिक संशोधकास साजेशा सत्यान्वेशी भूमिकेतून हा प्रश्न हाताळला आहे. राजकीय दृष्ट्या सोयीची आहे म्हणून सवंग आणि अतिसुलभीकरणाकडे झुकणारी मांडणी करण्याचे त्यांनी टाळले आहे. अत्यंत तर्कशुद्ध, वैज्ञानिक विचारपद्धतीचा अवलंब करून त्यांनी आपली भूमिका मांडली आहे. राजकीय सोय म्हणून सावरकर अहिंदूंना अभारतीय ठरवितात म्हणून आपणही ब्राह्मणांना परकीय आक्रमक संबोधून अभारतीय ठरवायचे अशा प्रकारच्या अनैतिहासिक दृष्टीकोनातुन डॉ. आंबेडकर या प्रश्नाकडे पहात नाहीत. अत्यंत संयत आणि विवेकनिष्ठ भूमिकेतून त्यांनी हा या विषयावर जे भाष्य केले आहे ते आज शास्त्रीय इतिहासाच्या कसोटीवरही सिद्ध होत आहे. आजही बहुजनवादी अभ्यासक, बुद्धिजीवीवर्गात आणि राजकारणात 'परकीय आक्रमक आर्य' विरुद्ध 'मूळनिवासी बहुजन, ब्राह्मणेतर' हेच मुख्य सूत्र असते. वस्तुतः यच्चयावत सर्वच ब्राह्मण 'आर्य' आहेत आणि ते सर्वच परकीय मुळांचे आहेत हा समज अनैतिहासिक आहे. एतद्देशिय समाजातील काही जाती-जमातींनी इतिहासक्रमात स्वतःचे ब्राह्मण जातीत उन्नयन केल्याचे दाखले इतिहासात आहेत. हे वास्तव दुर्लक्षिले जाऊ नये. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची अशी ठाम धारणा होती की, आज कोणताही वंश हा विशुद्ध स्वरूपात अस्तित्वात नसून सर्वच भारतीय लोक मिश्रवंशीय आहेत.[६३] डॉ. जी.आर. भांडारकरांना उद्धृत करून ते असेही निदर्शनास आणतात की भारतात असा एकही वर्ग किंवा जात नाही ज्यात परकीय रक्ताचे मिश्रण झालेले नाही.[६४] हे आज सर्वांनीच मान्य करणे, स्वीकारणे आपल्या हिताचे आहे. 'परकीय आर्य' विरूद्ध 'मूळनिवासी दलित-बहुजन' हे संघर्षसूत्र भ्रममूलक आणि अपूर्ण आहे. कारण आज भारतातील वास्तविक संघर्ष हा, 'शोषकवर्ग जाती' विरूद्ध 'शोषित वर्ग जाती' असा आहे. हे वास्तव समजून घेतल्याशिवाय दलित-शोषित वर्गजातींच्या चळवळींत आलेली मरगळ दूर होणार नाही. आज ब्राह्मणीप्रभुत्वा-खालील शोषक वर्ग जातींनी फॅसिस्ट रूप धारण केले असून ते अमेरिकन साम्राज्यशाही व बहुराष्ट्रीय कंपन्यांचे दलाल म्हणून काम करीत असल्याने शोषितवर्ग – जातींच्या शोषण-पीडणाची तीव्रता अधिकच वाढली आहे. अशा परिस्थितीत कोण परकीय मुळांचा आहे? कोण मूळनिवासी आहे? असे प्रश्न संभ्रम निर्माण करणारे आणि गैरलागू आहेत. मुद्दा आहे खरे शोषक कोण आहेत हे ओळखण्याचा आणि शोषितांच्या एकजुटीचा व मुक्तीचा.

**संदर्भ आणि टीपा**


१) Bertrand Russell 'The Ancestry of Fascism' in *'In Praise of Idleness'*, London, Allen and










Unwin, 1935, p. 114, उद्धृत - रूथ बेनेडिक्ट, (अनु. दिक्षित मिनाक्षी) *वंश आणि वंशवाद*, म.रा.सा.सं.मंडळ, मुंबई, १९८४, पा. १२७.

२) 'आर्यन डीबेट' विषयी युरोपियन प्राच्यविद्या-अभ्यासकांच्या विचारांचे विवेचन खालील संदर्भग्रंथांच्या आधारे केले आहे :

A) Bryant Edwin, *The Quest for the origins of Vedic Culture. The Indo - Aryan Migration Debate,* Oxford University Press, New Delhi 2001, pp. 13-56, 267-297.

B) Kuchhar Rajesh, *The Vedic People - Their History and Geography,* Orient Longman, India, 2002.

C) Devendra Swarup, *Genesis of the Aryan race theory and its application to Indian History in "The Aryan Problem"* (Edited by - Deo S.B. and Suryanath Kamath), Bharatiya Itihasa Sankalana Samiti, Pune, 1993, P. 30-39.

३) मुल्लर, मॅक्स, Biographical Essays, London - 1884, pp. 13. उद्धृत - Kuchhar Rajesh. The Vedic People - *Their History and Geography.* p. 9.

४) Sen Keshub Chunder. "Philosophy and Madness in Religion", In *Lectures in India,* Vol. I, Cassel and Co. London, P. 325 - Quoted in Kuchhar Rajesh, *The Vedic People - Their History and Geography,* p. 10.

५) चिपळूणकर विष्णूशास्त्री, *निबंधमाला,* पान - १२२९, १२६७.

६) उक्त, पान - ६१५

७) उक्त, पान - ६०६, ६०७

८) उक्त, पान - १०२९

९) *महात्मा फुले समग्र वाङ्मय* (आवृत्ती ४ थी, संपा. य.दि. फडके) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, १९९१ पान - १४३.

१०) सरवदे भीमराव, *पेरियार रामस्वामी,* समता प्रकाशन, नागपूर, १९९८, पान - ५४.

११) Bryant Edwin, *The Quest for the origins of Vedic Culture. The Indo - Aryan Migration Debate,* Oxford University Press, New Delhi 2001, p. 55.

१२) उक्त, पान - ५५

१३) उक्त, पान - ५६

१४) सावरकर वि.दा. *हिंदुत्व,* प्रकाशक - ग.वि. दामले, १९४७, पान - ७.

१५) उक्त, पान - ३६

१६) उक्त, पान - ४२

१७) उक्त, पाने - १२२ - १२३

१८) गोळवलकर मा.स., *विचारधन,* भारतीय विचार साधना, पुणे, १९८७, पान - ५४

१९) उक्त, पान - ७८

२०) उक्त, पान - ९२

२१) Bryant Edwin, *The Quest for the origins of Vedic Culture. The Indo - Aryan Migration Debate,* Oxford University Press, New Delhi 2001, p. 273.

२२) आर.एस. बिष्ट, सिताराम गोयल, नि.र. वऱ्हाडपांडे, श्रीराम साठे, शां.भा. देव, एस.आर. राव, नवरत्न राजाराम, सुभाष काक, जेम्स शॉफर, मार्क केनोयर, एस.पी. गुप्ता, भगवान सिंग, बी.जी. सिद्धार्थ, के.डी. सेठना, के.डी. अभ्यंकर, पी.व्ही. पाठक, श्रीकान्त तलगेरी, एस. कल्यानरामन, बी.बी. चक्रवर्ती, जॉर्ज क्युर्स्टन, डेव्हीड फ्रॉले (वामदेव शास्त्री), कोएनराड एल्स्ट, भिकू इदाते, रमेश पतंगे, इत्यादी संघ परिवाराशी संबंधित अभ्यासक-आर्यांचे परकीयत्व नाकारतात.

२३) सीताराम गोयल (ज्यांनी श्रीकांत तलगेरी यांच्या बहुचर्चित ग्रंथाची प्रस्तावना लिहिली आहे) यांच्यासह भिकू इदाते, रमेश पतंगे, एन. महालिंगम इत्यादी संघस्वयंसेवकांनी आपल्या विपर्यस्त-मांडणीच्या पुष्ट्यार्थ डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या 'हू वेअर दी शूद्राज' ग्रंथातील उद्धरणांचा आधार घेतला आहे उदाहरणार्थ -

अ) भिकू इकाते म्हणतात, 'आर्यांच्या मूळवसतिस्थानाबाबत त्यांनी मांडलेला सिद्धांत हा प्रखर राष्ट्रभक्तीचाच एक नमुना आहे... त्यांचे हे संशोधन 'राष्ट्रीयदृष्ट्या' अत्यंत मोलाचे आहे.'

ब) रमेश पतंगे लिहितात, 'आर्य भारतात बाहेरून आले, हा सिद्धांत खोटा असल्याचे त्यांनी 'हु वेअर दी शूद्राज?' या ग्रंथात सांगितले आहे – त्यांच्या प्रतिपादनाचा अर्थ स्पष्ट असून आपण सर्वजण एकाच आर्यवंशाचे असून मूळचे एकात्मच आहोत हा भाव आहे. समरसतेला यापेक्षा मोठा सैद्धांतिक आधार सापडणे कठीण आहे.' (रमेश पतंगे यांचा निबंध, 'डॉ. बाबासाहेबांचे साहित्य आणि समरसता, पहिले समरसता साहित्य संमेलन, जळगाव, ७-८ नोव्हें. १९९८).

क) तलगेरी श्रीकांत, *आर्यन इन्व्हेजन ॲन्ड, इंडियन नॅशनॅलिझम,* व्हाईस ऑफ इंडिया न. दिल्ली, १९९३, पाने ७-८.

ड) एन महालिंगम यांचा लेख, *'होम ऑफ द आर्यन्स', दी आर्यन प्रॉब्लेम,* शं.भा. देव, सुर्यकांत कामत (संपा.) भारतीय इतिहास संकलन समिती, पुणे १९९३.

संघपरिवाराकडून ही बौद्धिक कसरत स्वत:ची वांशिक पाळमुळं परकीय असण्याच्या न्यूनगंडातून किंवा मग राजकीय गणित अंगलट येऊ नये म्हणून करण्यात येत आहे हे स्पष्टच आहे.



अनुक्रमणिका

२४) *Dr. Babasaheb Ambedkar Writings and Speeches "BAWS"* Vol. 7 (Edited by Vasant Moon), Education Department Government of Maharashtra, 1990, P. 74

२५) उक्त, पान - ८५

२६) उक्त, पाने - ६६ ते ७०

२७) उक्त, पान - ७०

२८) उक्त, पान - ७५

२९) उक्त, पान - ७८

३०) उक्त, (खंड - ३) पान - ४१९

३१) उक्त, (खंड - ७) पान - ७८

३२) उक्त, पान - ८०

३३) मॅक्स मुल्लर *Biograpy of Words and the Home of the Aryans.* London, 1888, p. १२० उद्धृत - रूथ बेनेडिक्ट, (अनु. मीनाक्षी दिक्षित), *वंश आणि वंशवाद,* म.रा.सा.सं. मंडळ, मुंबई, १९८४, पा. १२.

३४) Thapar Romila, *The Penguin History of Early India. From the Origins to AD 1300,* Penguin Books, India 2003, p. 15

३५) उदा. भारतीय इतिहास संकलन समितीने प्रसिद्ध केलेल्या '*The Aryan Problem*' या निबंधसंग्रहात श्रीराम साठे, नि.र. वऱ्हाडपांडे, देवेन्द्र स्वरूप, शं.रा. वाळिंबे, के.के. शास्त्री यांचे निबंध (देव एस.बी. आणि काम सुर्यकांत (संपा.), *दि आर्यन प्रॉब्लेम,* भारतीय इतिहास संकलन समिती, पुणे, १९९३.

३६) रूथ बेनेडिक्ट, *वंश आणि वंशवाद,* (अनु. मीनाक्षी दिक्षित), महाराष्ट्रराज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९८४, पा. १२.

३७) नेस्तुर्ख म.प., *मानवजाती (मानव वैज्ञानिक विवेचन),* हिन्दी अनुवाद - नरेश वेदी, प्रगती प्रकाशन, १९७३, मास्को पा. १२१.

३८) उक्त, पान - १२८

३९) *Dr. Babasaheb Ambedkar Writings and Speeches "BAWS"* Vol. 7 (Edited by Vasant Moon), Education Department Government of Maharashtra, 1990, P. 78.

४०) उक्त, पान - ७१

४१) उक्त, पान - ७४

४२) उक्त, (खंड ३) पान - १७४

४३) पहा मायकेल विट्झेल यांचा लेख *"Horse Play In Harappa"* In "Frontline" Vol. 17, No. 19, Sept. 30 - Oct. 13, 2000, pp. 4-14.

४४) शर्मा आर.एस. *लुकिंग फॉर दि आर्यन्स,* ओरिएन्ट लॉंगमन, इंडिया, १९९५, पाने १४-३२

४५) *BAWS*, (खंड ७) पान - ७५

४६) कोचर राजेश, *दि वेदिक पीपल,* ओरिएन्ट लॉंगमन, नवी दिल्ली, २००२, पान - १४० आणि शर्मा आर.एस. *दि एडव्हेंट ऑफ द आर्यन्स,* मनोहर पब्लीकेशन, नवी दिल्ली, १९९९, पा. ६७.

४७) *BAWS*, (खंड ७) पान - ७४

४८) उक्त, (खंड ७) पाने - ७५ - ७६

४९) Thapar Romila, *The Penguin History of Early India. From the Origins To AD 1300.* Penguin Books, India 2003, P. 15

५०) उक्त, पान - १०५ - १०७

५१) *BAWS* (खंड ७) पान ७८ - ७९

५२) उक्त, पान - ८०

५३) आर्यांचे दोन समूह होते या निष्कर्षाच्या समर्थनार्थ, डॉ. आंबेडकर, ऋग्वेदातील पुढील ऋचांचा उल्लेख करतात -

1) Rigveda VI. 33.3 - "Oh Indra, Thou hast killed both of our opponents, the Dasas and the Aryas."

2) Rigveda, VI. 60.3 - "Indra and Agni - these protectors of the good and righteous suppress the Dasas and Aryas who hurt us."

3) Rigveda, VII. 81.1 - "Indra and Varuna killed the Dasas and Aryas who were the enemies of sudas and thus protected sudas from them."

4) Rigveda, VII. 24.27 "Oh you Indra, who saved us from the hands of the cruel Rakshasas and from the Aryas living on the banks of the Indus, do thou deprive the Dasas of their weapons."

5) Rigveda, X, 38.3 - "Oh you much revered Indra, those Dasas and Aryas who are irreligious and who are our enemies, make it easy for us with your blessings to subdue them with your help we shall kill them."

6) Rigveda, X. 86.19 - Oh you Mameya, you give him all powers who prays you, with your help we will destroy our Arya and our Dasya enemies Quoted in, *"Who Were The Shudras"* : *BAWS*, Vol. 7; P. 86.

५४) *BAWS* (खंड ७), पान - ९७

५५) उक्त, पान - १०७

५६) उक्त, पान - १००

५७) उक्त, पाने - ९८ - ९९

५८) कोचर राजेश, *दि वेदिक पीपल,* ओरिन्एट लाँगमन, नवी दिल्ली, २००२, पान - २२४.
५९) *BAWS* (खंड ७) पाने - ११४ - १२१
६०) उक्त, पान - ७९
६१) उक्त, (खंड १८) भाग ३, २००२, पान २५७
६२) उक्त, (खंड ७) पान - १००
६३) अ) *'भारतातील बहुतांश प्रजा ही मिश्रवंशिय आहे – भारतातील बहुसंख्य जमाती ह्या मिश्रवंशिय आहेत.'* — सिंग, के.एस. (संपा.) *पीपल ऑफ इंडिया सिरीज - ॲन इंट्रोडक्शन,* खंड १, ॲंथ्रोपोलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, कलकत्ता, १९९२, पान ७१.
ब) मानवशास्त्राच्या अभ्यासकांचा हवाला देवून डॉ. बाबासाहेब आंबेडकर याकडे लक्ष वेधतात की, 'भारतीय लोकसंख्या ही आर्य, द्रविड मंगोलियन आणि सिथियनांचे मिश्रण आहे. हे सर्व लोकसमूह ते भटक्या अवस्थेत असताना शेकडो वर्षांपूर्वी विविध दिशांकडून विविध संस्कृतींसह येथे आलेत '*BAWS,* खंड १ पान - ६' अलिकडील मानववंश-शास्त्रज्ञांच्या मते कोठेही विशुद्धवंशाचा मानव अस्तित्वात नाही आणि जगभरातल्या कोणत्याही भागात सर्वत्र वंश मिश्रण झालेले दिसेल *BAWS*, खंड - १ पान ४८
६४). *BAWS*, (खंड १) पान - ४८.

**











# जवाहरलाल नेहरू : नियोजनबद्ध विकास आणि राष्ट्रीय पुनरुत्थान

श्री. तारलोक सिंघ

अनुवादक : श्री.मा. भावे

राष्ट्रीय चळवळीच्या काळात स्वातंत्र्याचा सामाजिक व आर्थिक आशय उलगडून सांगण्याची उत्कट इच्छा, गांधींच्या खालोखाल, नेहरूंच्या मनात वसत होती. राष्ट्रीय चळवळीतून अनेक थोर नेते राष्ट्रापुढे आले. पण नेहरूंचा हा विशेष होता की, त्यांनी गरिबी व नियोजनबद्ध विकास या प्रश्नांचा व्यापक राजकीय व आर्थिक संदर्भात विचार केला होता इतकेच नव्हे तर या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी लागणारे सामाजिक तत्त्वज्ञान आणि मूल्ये यांचीही मांडणी केली होती. आता मागे वळून पाहता असे वाटते की, स्वातंत्र्यानंतर गरिबी नाहीशी करणे व नियोजनबद्ध विकास साधणे यासाठी जी व्यावहारिक पावले उचलावी लागणार होती त्यांची तयारी नेहरूंनी स्वातंत्र्यपूर्व काळातच केली होती. त्यामुळे आधीची स्वातंत्र्य सेनानीची भूमिका सोडून राज्यधुरंधराची (स्टेट्समन) भूमिका स्वीकारणे नेहरूंना अडचणीचे गेले नाही.

– १ –

जवाहरलाल नेहरूंनी ज्या मोठ्या कल्पना मनाशी बाळगल्या होत्या व जो सामाजिक आणि आर्थिक दृष्टिकोन स्वीकारला होता त्यांची अंमलबजावणी त्यांनी ज्या राष्ट्रीय योजना एका मागून एक राबवल्या त्यांतून केली. देशभर व निरनिराळ्या क्षेत्रांत लक्षावधी लोक विकासाच्या कामात पूर्वीपासून गुंतलेले होते. या योजनांमुळे अशा माणसांना आपल्या विचारांसाठी व कृतीसाठी आधार मिळाला. एका अद्वितीय नेत्याने निर्माण केलेले तत्त्वज्ञान आणि राष्ट्रीय योजनांतून त्या तत्त्वज्ञानाला मिळालेले प्रकट स्वरूप याचा राष्ट्रीय जीवनावर अतिशय प्रभाव पडला. नेहरूंच्या तत्त्वज्ञानाला त्यामुळे राष्ट्रीय पुनरुत्थानाचे स्वरूप आले. इतर सामाजिक व राजकीय विचारवंत आणि नेहरू यांच्यांत हा फरक आहे. त्यामुळे एरवीच्या विचारवंतांच्या तत्त्वज्ञानाला आपण ज्या बौद्धिक कसोट्या लावतो त्या पेक्षा निराळ्या कसोट्या आपल्याला नेहरूंच्या विचारसृष्टीला लावाव्या लागतात. भविष्यातील राष्ट्रीय नियोजन व त्याची अंमल-बजावणी यात नेहरूंच्या विचारांना जे स्थान लाभेल त्यावर नेहरूंच्या विचारांचे सामर्थ्य व त्या विचारांविषयी तरूण पिढीला वाटणारे कुतूहल या गोष्टी अवलंबून राहतील. नेत्याची विचारप्रणाली काही असो, ज्या माध्यमातून ते विचार व्यक्त होतात व ते विचार कोणत्या मूलभूत समस्या सोडवितात यावरून त्या विचारप्रणालीचे परिणाम लोकांच्या प्रत्ययाला येतात. ज्या वास्तवाशी आणि अंमल-बजावणीच्या साधनांशी त्या विचारप्रणालीची सांगड घातली गेली होती त्या वास्तवापासून आणि अंमलबजावणीपासून ती प्रणाली निराळी केली तर ती प्रणाली समाजाला मार्गदर्शक म्हणून उपयोगी पडेलही पण समाजाच्या धारणेवर व प्रगतीवर त्या प्रणालीची जी मुद्रा उमटली, तिचे ज्ञान होणार नाही.

भारताच्या आर्थिक व सामाजिक प्रश्नांचा विचार करणारे नेहरूंचे समकालीन व नेहरू यांच्यात दोन प्रकारचा फरक होता. एक, या विचारवंतांचा अभ्यास दांडगा होता, त्यांना तपशिलांची चोख माहिती होती व त्यांचे ज्ञानही विशाल होते; परंतु यातील एकापाशीही नेहरूंचा विस्तृत आवाका, प्रश्नांचे प्रत्यक्ष ज्ञान आणि एक समावेशक दृष्टिकोन नव्हता. दुसरे असे की, नेहरूंचा या प्रश्नांबाबतचा दृष्टिकोन व त्यांनी अंगी बाणवलेली व्यक्तिविषयक व समाजविषयक मूल्ये ही एकजीव झालेली होती. इतरांची अशी गोष्ट नव्हती. नेहरू जे काही बोलत व करत त्यात त्यांनी आपला जीव ओतलेला आहे. ते या विषयांबाबत बोलत ते अगदी प्रामाणिकपणे आणि अकृत्रिमपणे. काही प्रश्न एखाद्या व्यक्तीला इतके महत्त्वाचे वाटतात की, त्यांच्याविषयी बोलताना किंवा त्यांच्यासंबंधात कृती करताना माणसाचे अंत:करण त्यात गुंतलेले कळते.

---

* हा लेख 'स्टडीज इन मॉडर्न इंडियन हिस्टरी, नंबर वन' या बी.आर. नंदा व व्ही.सी. जोशी यांनी संपादिलेल्या व ओरिएन्ट लॉंगमन (दिल्ली) यांनी १९७२ साली प्रसिद्ध केलेल्या पुस्तकातून घेतला आहे. श्री. तारलोक सिंग हे भारतीय प्रशासन सेवेत उच्च दर्जाचे अधिकारी होते व नंतर नियोजन मंडळाचे सदस्यही होते. त्यांचा हा लेख १९६७ साली लिहिलेला होता.

अनुक्रमणिका








नियोजन व विकास हे विषय नेहरूंच्या जिव्हाळ्याचे असल्याने त्यांच्यावर बोलताना नेहरू महत्त्वाच्या आणि दीर्घपरिणामी मुद्यांना चटकन हात घालीत, वर्तमानकालीन गुंत्यांच्या ते पलीकडे जात, त्यांचे विचार हमखास सुयोग्य आणि त्यांनी ठरविलेल्या मूलभूत विचारांच्या चौकटीशी सुसंगत असे असत.

भारतीय जीवनपद्धतीची आर्थिक व सामाजिक अंगे आणि लोकशाहीला अभिप्रेत असणारी जीवन पद्धती यांच्या संबंधांत नेहरूंनी व्यक्त केलेले विचार त्यांच्या प्रांजळ व्यक्तिमत्त्वाचे प्रामाणिक दर्शन घडवणारे होतेच पण भारतीय वास्तव, त्या वास्तवामुळे (नियोजन व विकासावर) पडणाऱ्या मर्यादा आणि (दुसऱ्या बाजूला) या वास्तवामुळेच निर्माण झालेल्या (नियोजन व विकास यांच्या बाबतीतील) शक्यता यांना नेहरूंनी दिलेला प्रतिसाद, असेही त्या विचारांचे रूप असे. ज्या काळात नेहरू वावरले व भारताने स्वातंत्र्य मिळविले त्या काळाच्या काही गरजा होत्या. (नेहरूंचे नियोजनाविषयीचे चिंतन हे) त्या गरजांना दिलेले समर्पक उत्तर असे. विसाव्या शतकाच्या तिसऱ्या व चौथ्या दशकात भारतात जी परिस्थिती होती व जे विचार लोकांच्या मनात घुसमटत होते त्यांचे प्रतिबिंब नेहरूंच्या चिंतनात पडलेले होतेच; पण भविष्यात जो विकास साधायचा त्याची बीजेही या (स्वातंत्र्यपूर्व काळात व्यक्तविलेल्या) चिंतनातून दिसून येतात.

नेहरूंच्या हयातीतच त्यांच्या नियोजनाविषयी ज्या कल्पना होत्या त्यांचे गंभीर परीक्षण खुद्द नेहरूंनी व देशाने करायला हवे होते. तसे झाले असते तर ते दोघांच्याही हिताचे झाले असते. या कल्पनांतील व्यावहारिक अडचणी ध्यानात येऊन त्यांच्यावर तोडगे काढता आले असते. पण झाले असे की, नेहरूंच्या कल्पनांना (विशेष चर्चा न होताच) मान्यता मिळत गेली व आता (१९७२* साली), नेहरू वारल्यानंतर, त्या कल्पनांविषयी हरकती घेण्यात येत आहेत. पूर्वी ज्या उतावळेपणाने नियोजनाच्या संकल्पनेला मान्यता देण्यात आली, त्याच उतावळेपणांने आता टीका करण्यात येत आहे. शिवाय या टीकेसाठी वापरलेले युक्तिवाद पुष्कळदा फसवे असतात. हे खरेच आहे की, कोणाचेही विचार त्रिकालाबाधित नसतात. एकूण विचारांपैकी काही विचार भविष्यातही मार्गदर्शक ठरणारे असतात तर काही विचार समकालीन परिस्थिती व प्रश्न यांच्यापुरते मर्यादित असतात. जसजशी परिस्थिती बदलते, नवीन समस्या पुढे येतात तसतसे हे (समकालीन संदर्भांना धरून असणारे) विचार त्यांना पुरवणी जोडून पुढे न्यावे लागतात किंवा त्यांना मुरड घालावी लागते. या दृष्टिकोनातून विचार केला तर असे दिसून येईल की, (नियोजना) विषयी नेहरूंचे विचार व त्यांची अंमलबजावणी ही दोन्ही कालसापेक्ष असल्याने त्यांना परिपूर्ण म्हणता येत नाही. पण भारतापुढील आव्हानांना तोंड देण्यात समर्थ असणारी आणि आपण जो मार्ग चोखाळू तो बरोबर आहे असा धीर देणारी दुसरी कोणती विचार प्रणाली आपल्यापाशी नाही.

– २ –

नियोजनासंबंधीचे आपले विचार व कल्पना नेहरूंनी वेळोवेळी लोकांसमोर मांडल्या होत्या. पहिल्या तीन पंचवार्षिक योजनांचे मसुदे संसदेपुढे मांडताना केलेली भाषणे; १९४८ व १९५६ साली औद्योगिक धोरणावर संसदेत चर्चा चालू असताना केलेली भाषणे; राष्ट्रीय विकास परिषद (नॅशनल डेव्हलपमेंट कौन्सिल) या व्यासपीठावरून त्यांनी महत्त्वाच्या प्रसंगी केलेली भाषणे आणि निरनिराळ्या स्वरूपाच्या सभांसमोर त्यांनी मांडलेले विचार यांतून भारताच्या विकासाच्या वाटचालीबद्दलची त्यांची भूमिका समजून येते. त्यांची मूलभूत गृहीतके व स्वीकारलेली मूल्ये यांच्या सहाय्याने त्यांनी काही सामाजिक उद्दिष्टे ठरवली होती व ती पुरी करण्याचे साधन म्हणून ते पंचवार्षिक योजनांकडे पाहात होते. दुसऱ्या बाजूने पाहिले तर असेही म्हणता येईल की, आपण ठरविलेल्या प्राथमिकता (प्रायॉरिटीज) आणि आर्थिक धोरणाबद्दलच्या आपल्या संकल्पना यांचे परिष्करण त्यांनी नियोजनाच्या गरजांच्या संदर्भात केले. नेहरूंची गृहीतके, मूल्ये, समाजाविषयीचा त्यांचा दृष्टिकोण, योजनांची दिशा, आर्थिक धोरण व अर्थदया याबद्दलचे त्यांचे विचार, विकासाच्या संदर्भात त्यांनी आयोजिलेली विज्ञानाची साथ यांचा थोडक्यात आढावा आपण घेणार आहोत. हे करताना काही शंका व प्रश्न उपस्थित करावे लागतील. पण ते उपस्थित करण्याचा उद्देशही नेहरूंच्या नियोजनबद्ध विकासाच्या बाबतीतील कल्पना स्पष्ट व्हाव्यात व नवीन संदर्भात त्या कल्पनांचे स्वरूप काय राहील याची समज उत्पन्न व्हावी, हाच आहे.

एखाद्या विचारवंताच्या विचारांना जे प्रत्यक्ष कृतीतून रूप येते त्या रूपापासून मागे जात ज्या गृहीतकापासून ते

* हा लेख श्री. सिंघ यांनी १९६७ साली लिहिला होता पण तो १९७२ साली प्रसिद्ध झालेल्या पुस्तकात प्रसिद्ध झाला याचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे.

अनुक्रमणिका

विचार उगम पावले त्या गृहीतकांचा शोध घ्यावयाचा व ती उलगडून दाखवायची ही सोपी गोष्ट नाही. नेहरूंचे मन मोठे होते व ज्या विषयात ते रस घेत ते विषयही पुष्कळ होते. त्यामुळे नेहरूंनी स्वीकारलेली गृहीतके व त्यांच्यापासून उद्‌भवलेले विचार असा भेद करणे अवघड आहे. भारताचा इतिहास; पश्चिम, दक्षिण व आग्नेय आशिया यांना तो कवेत घेऊ शकेल असे त्याचे भौगोलिक स्थान; भारताची स्वातंत्र्याची चळवळ व तिच्यावरील गांधीजींच्या शिकवणीचा प्रभाव; इंग्रजांनी केलेले सत्तांतर या सगळ्यांचे एक रसायन बनून त्यातून नेहरूंची भारताविषयीची प्रतिमा तयार झाली होती. तिच्यापासून आपण सुरूवात केली पाहिजे. भारताचे अर्थस्रोत मर्यादित असले तरी भारताची स्थिती अनन्यसाधारण अशी होती. आर्थिक, सामाजिक व राजकीय सुस्थिती प्राप्त करून घेण्यासाठी भारताला ज्या समस्यांशी सामना करावा लागत होता त्या समस्याही भारतविशिष्ट अशा होत्या. त्यामुळे त्या समस्यांवरचा तयार तोडगा कुठून आणता येणार नव्हता. ते प्रश्न भारतीय जनतेने आपल्या अभिजात शहाणपणानेच सोडवावयाचे होते. नेहरूंचा भारतीय जनतेवर परम विश्वास होता आणि हे प्रश्न सोडविण्याची योग्यता जनतेच्या ठिकाणी आहे याची त्यांना खात्री होती. सुस्थिती संपादन करण्याच्या प्रश्नाच्या मर्मस्थानी उद्दिष्ट व साधने यांच्यातील ताळमेळाचा मुद्दा होता. नेहरूंची अशी बळकट धारणा होती की, उद्दिष्टे व ती प्राप्त करून घेण्याची साधने यांच्यातील संबंध अतिशय निकटचा व जिव्हाळ्याचा असतो. आयुष्यातील झगड्यात ही धारणा शाबूत ठेवणे कठीण जाते. नेहरू सांगत असत की, उद्दिष्ट निखालस शुद्ध असले तरी त्याच्या प्राप्तीसाठी वापरलेली साधने दोषपूर्ण असतील तर त्यांच्यामुळे उद्दिष्ट दूषित होईल आणि आपण चुकीच्या मार्गाला लागू.

भारताची अनन्यसाधारण स्थिती आणि साधनशुचिता या दोन गृहीतकांपासून तिसरे गृहीतक सहजच निष्पन्न होते. ज्या गोष्टी घडवून आणायच्या होत्या त्या मूलगामी परिणाम करणाऱ्या होत्या आणि त्यांच्या बाबतीत समाजात कमालीची मतमतांतरे होती. यासाठी आपल्या उद्दिष्टांच्या दिशेने वाटचाल करताना विधायक व सर्वांना संमत असा मार्ग स्वीकारण्याची आणि विरोधकांची मनधरणी करून आपल्या निर्णयांना त्यांची मान्यता मिळविण्याची गरज होती. जे संवेदनाशील लोक असतात त्यांना माणसामाणसातील दुर्लंघ्य विषमता, त्यांच्यातील भेदभाव, समाजातील एका वर्गासाठी संधींचा दुष्काळ तर दुसऱ्या बाजूला दारूण उधळपट्टी या वस्तुस्थिती असह्य होतात. म्हणून वर्गावर्गातील विषमता संपवून वर्गविरहित समाज निर्माण करण्याचे ध्येय आपण ठेवले पाहिजे. उपभोगसाधने बळकाविण्याची वृत्ती सोडून सहकार्याची कास धरली पाहिजे. (असे नेहरूंना वाटे.)

१९५२ साली नेहरूंनी सांगितले होते, "आपली अर्थ-व्यवस्था व समाजरचना आता कालबाह्य झाल्या आहेत. आपल्या सर्व लोकांचे भौतिक व अतिभौतिक समाधान ज्यामुळे वाढेल अशी आपल्या अर्थव्यवस्थेची व समाजव्यवस्थेची पुनर्रचना करणे निकडीचे होऊन बसले आहे. ज्यामुळे समाजात मूलगामी परिवर्तन होईल अशा सामाजिक तत्त्वज्ञानाचा आधार आपण घेतला पाहिजे. जिथे खाजगी नफेखोरी व वैयक्तिक वखवख यांचा बुजबुजाट नाही व राजकीय आणि आर्थिक सत्तांचे न्यायपूर्ण वितरण झालेले आहे, असा समाज आपण बांधायला हवा. वर्गविहीन समाजाची इच्छा आपण धरली पाहिजे. अशा समाजात सर्व घटकांचे परस्परांशी सहकार्य राहील आणि प्रत्येकाला (विकासाची) संधी मिळेल. (मात्र) असा समाज घडवून आणण्या-साठी आपण शांततापूर्ण व लोकशाही मार्गानेच झटले पाहिजे!'

ही उद्दिष्टे आपल्याला हिंसक क्रांतीतून किंवा शांततापूर्ण उत्क्रांतीच्या मार्गाने साध्य होऊ शकतात. नेहरूंनी हा दुसरा मार्ग स्वीकारला व आयुष्यभर ते त्या मार्गाने चालले. हे सुद्धा त्यांचे एक मूलभूत गृहीतकच होते. मनःप्रवृत्ती, शिकवण व सारासारविचार अशा तिन्ही कारणांनी त्यांना हे गृहीतक मान्य केले होते. फाळणीनंतरच्या काही महिन्यात ज्या उलथापालथी झाल्या त्यामुळे नेहरूंची खात्री पटली की, (विकासासाठी) स्थैर्य, सातत्य आणि मुख्य म्हणजे उत्पादन यांची नितान्त आवश्यकता आहे. ईप्सिताच्या दिशेने आपण एक पाऊल पुढे गेलो, पण त्यासाठी दुसऱ्या दिशेकडून आपल्याला चार पावले माघार घ्यावी लागली तर आपण प्रगती केलीच नाही, असे म्हणावे लागेल. कोणतीही गोष्ट घडवून आणायची तर त्याला फार परिश्रम पडतात; मात्र ती उद्‌ध्वस्त करायला फारसा वेळ लागत नाही. पण तत्कालीन परिस्थितीची गरज एवढ्याचसाठी नेहरूंनी राष्ट्राच्या पुनरुत्थानासाठी विधायक मार्ग स्वीकारला, असे नाही. लोकशाही व लोकशाही-प्रक्रिया यांच्यावर नेहरूंचा अढळ विश्वास होता. माणसातील धाडस व व्यक्तिगत स्वातंत्र्य यांच्या जोपासनेसाठी लोकशाही व लोकशाही-प्रक्रिया गरजेच्या

आहेत, असे त्यांचे मत होते. नेहरूंची अशी अपेक्षा होती की, राजकीय लोकशाहीतून आर्थिक व सामाजिक लोकशाहीदेखील अवतरेल. लोकशाहीच्या ठिकाणी संस्थात्मक बदल घडवून आणण्याचे धैर्य व उत्साह नसेल तर आर्थिक व सामाजिक विषमता कमी न होता वाढतच जाते आणि महत्त्वाची आर्थिक व सामाजिक विषमता कमी न होता वाढतच जाते आणि महत्त्वाची आर्थिक व सामाजिक उद्दिष्टे दूरच राहतात, हा जो आपल्याला आज पडलेला प्रश्न आहे, तो नेहरूंच्या समोर नव्हता.

नेहरूंना (भारताच्या विकासाविषयी) जी आशा वाटत होती; तिची तीन कारणे होती. एक, लोकशाही-प्रक्रियेतून नव्या, स्वतंत्र शक्ती पुढे येतात, असा त्यांचा विश्वास होता; दोन, औद्योगीकरणाचे स्वतःचे असे (परिवर्तनकारी) परिणाम असतात; आणि तीत विज्ञान, तंत्रज्ञान व नवी ऊर्जासाधने यांचे काही दीर्घगामी परिणाम होतात. या सर्वांमुळे नेहरूंना अशी आशा वाटे की, आपली सामाजिक उद्दिष्टे संपादन करण्यात लोकशाही यशस्वी होईल. ते वारंवार असा इशारा देत की, मानवी व सामाजिक उद्दिष्टे राजकीय लोकशाहीतून साध्य होत नाहीत असे दिसल्यास लोक लोकशाहीचा त्याग करतील. पहिल्या पंचवार्षिक योजनेचा आराखडा संसदेपुढे मांडताना ते म्हणाले होते की, (मानवी व सामाजिक उद्दिष्टे साध्य) न झाल्यास लोकशाही नाहीशी होऊन अशी आर्थिक व सामाजिक संरचना अस्तित्वात येईल की, ती आपल्याला आवडणारी नसेल. शेवटी, कोणती राजकीयप्रणाली स्वीकारायची याचा निर्णय घेताना त्या प्रणालीपासून कोणते फळ पदरात पडते, हे देशाला लक्षात घ्यावे लागेलच. नेहरू एका बाजूने फळ-प्रामाण्य-वादी (प्रॅग्मॅटिक) भासतात, ते विचारप्रणाली (आयडियॉलॉजी) व तात्त्विक भूमिका यांना कमी महत्त्व देतात, असे वाटते. प्रत्येक वेळी ते मध्यममार्ग अवलंबितात, पण त्याच वेळी त्यांचा असाही घोशा असतो की, राष्ट्र, संस्था व राष्ट्राच्या कार्यपद्धती कसोटीला लागत आहेत, स्वसंतुष्टपणा आणि दीर्घसूत्रीपणा यांना इथे थारा देता कामा नये. भारताच्या विकासाची क्रमणा योग्य मार्गाने व्हावी याची आस त्यांना लागली होतीच, पण एखादी चाल फसली तर तिचाच हट्ट न धरता दुसरी उपाययोजना करण्याला त्यांची ना नव्हती. विकासाची गती कायम राखली पाहिजे असे त्यांचे सांगणे असेच पण विज्ञान व तंत्रज्ञान यांच्यामुळे जे मोठे बदल घडत आहेत त्यांच्या योगाने माणसांची मने व सामाजिक शक्ती यांच्यातही बदल होतात, यावर त्यांचा भरवंसा असे.

– ३ –

नियोजनाविषयी नेहरूंना वाटणारी आस्था जशी वैचारिक होती तशी भाविकही होती. नेहरू देशभक्त होते व इतिहासकारही होते. त्यांच्याच शब्दात सांगायचे, तर ते एक भव्य स्वप्न पाहात होते. एक राष्ट्र स्वतःची नव्याने बांधणी करीत असल्याचे स्वप्न. (त्यासाठीच त्यांचा आग्रह असे की) श्रीमंतांनी अधिक श्रीमंत व्हावे अशा उद्देशाने कार्य करणाऱ्या शक्ती नाहीशा होतील आणि गरिबांना दारिद्र्याचा अडथळा ओलांडता येईल असे करणाऱ्या शक्ती प्रबळ होतील, अशा तरतुदी नियोजनात असल्या पाहिजेत. माणसांना दुःख न देता आणि व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर बंधने न आणता दारिद्र्याचा शेवट कसा करावा, याचा ते वारंवार विचार करीत आणि नियोजनबद्ध विकास हेच त्याचे उत्तर आहे, या निष्कर्षावर येत. सामाजिक, आर्थिक, शेतीविषयक, आद्योगिक इत्यादी सर्व क्षेत्राना नियोजनाच्या सहाय्याने एका चौकटीत बसवता येते व त्यातून समस्यांची उत्तरे मिळत राहतात.

नियोजनाला दुसऱ्या एका दृष्टिकोनातून देखील अपार महत्त्व आहे. नियोजन हे राष्ट्राची एकता साधण्याचे व ती बळकट करण्याचे साधन होते. त्यातून सामान्य माणसाला जिचा दिलासा वाटेल अशी लोकशाही उभी राहणार होती. भारतात पहिली निवड होती. ती ऐक्य जोपासण्याची, केवळ राजकीय ऐक्य नव्हे तर मतांचे व हृदयांचे ऐक्य. धर्म व प्रांत यांच्या नावावर उभारलेल्या भिंती ज्यामुळे ढासळून पडतील, असे ऐक्य. आपल्या समस्यांची एकात्मिक व जिव्हाळ्याने परिपूर्ण अशी जाणीव आपल्यालाच घडवून देण्याचे सामर्थ्य नियोजनात आहे.. गाव, जिल्हा, प्रांत यांच्यात विखुरलेल्या समस्यांना एक समावेशक संदर्भ देण्याचे काम नियोजन करते. ज्या ईप्सितासाठी आपसातील दुसरे व भेदाभेद विसरून संपूर्ण राष्ट्राने कष्ट घ्यावेत अशी ईप्सिते नियोजनातुन राष्ट्रापुढे ठेवता येतात. ही ईप्सिते लोकशाहीच्या मर्यादा सांभाळूनच हस्तगत करावयाची होती. जवाहरलाल नेहरूंच्या मते लोकशाही मार्गाने कामे पुरी करण्यास विलंब लागत असेल, पण जे काम होते ते भक्कम पायावर उभे राहाते आणि संबंधित प्रत्येक व्यक्तीच्या अडीअडचणींचा विचार करून केले जाते. त्यांना असे वाटे की, लोकशाही पद्धतीने (कामे करण्यात) ज्या मर्यादा पडतात, त्या काही लोकशाहीच्या अंगभूत मर्यादा नव्हेत. लोकशाही यंत्रणेचा जर योग्य वापर केला, तर जे जे








अनुक्रमणिका

काही आपण करू इच्छितो ते करण्याची व्यवस्था करता येते; आणि तसे होऊ शकले तरच लोकशाही यंत्रणेचा उपयोग!

नियोजनाची उद्दिष्टे घटनेतच सांगितलेली होती, या गोष्टीला नेहरूंच्या नियोजनाविषयीच्या भूमिकेला महत्त्वाचे स्थान होते. त्यामुळे घटनेतील तरतुदींचा अवलंब करूनच योजना अंमलात आणावयाच्या होत्या. १९५० साली नियोजन मंडळाच्या स्थापनेचा ठराव करताना आणि १९५६ सालचा औद्योगिक धोरणाचा ठराव करताना याच विचाराचा पाठपुरावा नेहरूंनी केला. असे असले तरी घटनेला काही अपरंपार पावित्र्य (सँक्टिटी) आहे, हे नेहरूंना मान्य नव्हते. जर गरजेचे वाटले तर घटना दुरुस्त करता आली पाहिजे, दुरूस्त्या अशक्य करून ठेवणे म्हणजे घटनेचा जीव घेणेच होय, असे त्यांचे मत होतो. जीवनाची वाट सरळ नसते, ती नागमोडीने जाते आणि राष्ट्राच्या जीवनाची वाट तर आणखीच नागमोडी असते. यासाठी तुमच्या कृतीत व देशाच्या घटनेत लवचिकता असली तर ती विकासाला उपयुक्त होईल.

प्रत्येक पंचवार्षिक योजनेकडे नेहरू स्वतंत्र व स्वयंपूर्ण योजना म्हणून न पाहता राष्ट्राच्या विकासक्रमातील टप्पा म्हणून पाहात. विकासाच्या ह्या कार्यक्रमात उसंत घेण्याला वाव नव्हता. दीर्घकालीन नियोजनाकडे पाहण्याची नेहरूंची ही दृष्टी होती. प्रत्येक पंचवार्षिक योजनेचा पहिला व शेवटचा दिवस हे त्यांच्या दृष्टीने देशाच्या इतिहासातील असाधारण महत्त्वाचे दिवस होते. त्यांचे मन नेहमी भविष्यात झेप घेत असे. एका पंचवार्षिक योजनेची आखणी होते न होते तोच पुढच्या पंचवार्षिक योजनेचा आराखडा करण्याचा ते आदेश देत. प्रत्येक योजनेत कोणत्या अंकावर भर आहे, इकडे त्यांचे लक्ष्य असे. आकडेवारी व उत्पादनाची लक्ष्ये यांना त्यांच्या लेखी कमी महत्त्व होते. मुख्य चौकट पक्की ठरली की तपशील भरणे हे दुय्यम महत्त्वाचे ठरते. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या आढाव्यातून पुढे आलेल्या समस्या व तिसरी पंचवार्षिक योजना तयार करताना हाती असलेली साधने व गरजा यांच्यातील आ वासलेली दरी या प्रश्नांमुळे नेहरू बिचकले नाहीत. कारण त्यांना हे पटले होते की, विकासाची वाटचाल सलग व सतत असते; त्यातील या अगर त्या टप्प्याचे महत्त्व तारतम्यानेच घेतले पाहिजे. १९६२च्या नोव्हेंबरात (चिनी आक्रमणामुळे) नवी आव्हाने पुढे आली आणि 'तिसरी योजना मोडीत काढावी' असा विचार प्रशासनातील काही लोक मांडू लागले, त्या वेळीही नेहरू ठाम राहिले. आपली योजना ही राष्ट्राच्या जीवनाचे अविभाज्य अंग आहे. ज्याप्रमाणे ताणे व बाणे हे वस्त्राचे वेगळे न काढता येणारे तंतू असतात, त्याप्रमाणे योजना देखील राष्ट्राशी एकजीव बनली आहे (असा त्यांचा प्रतिवाद होता.), ते म्हणाले होते, आपल्याला आक्रमणाला तोंड द्यायचे आहे व इतरही अडचणी आहेत म्हणून योजना निकालात काढावी, असे काही लोक म्हणतात, त्याचा अर्थच मला समजत नाही. परिस्थितीचा हा अगदी चुकीचा अर्थ लावला जात आहे. खरे तर, युद्धप्रयत्नासाठी नियोजनाची जास्त जरूर असते." आजच्या (१९७२) आर्थिक व सामाजिक वास्तवात सुद्धा हे विचार तितकेच उपयोगाचे आहेत.

– ४ –

जवाहरलाल नेहरूंची आर्थिक धोरणे व अर्थव्यवस्थेविषयीची त्यांची दृष्टी त्यांच्या समाजाविषयीच्या चिंतनातून निर्माण झाली होती. कोणाही व्यक्तीच्या जीवनाची व विचारांची लखोटबंद विभागात वाटणी करता येत नाही; या गोष्टी एकसंध असतात. असे ते मानत. त्यांची मूल्ये व नियोजनाची त्यांची संकल्पना यांच्याशी त्यांचे अर्थव्यवस्था व समाजव्यवस्था या संबंधीचे विचार एकरूप झालेले होते. मध्यावधी सरकारचे उपाध्यक्ष म्हणून जबाबदारी स्वीकारल्यानंतर लगेचच, सप्टेंबर १९४६ मध्ये, त्यांनी घोषणा केली की, आमचे उद्दिष्ट सहकारी लोकसमाज (को-ऑपरेटिव्ह कॉमनवेल्थ) उभारणे, हे आहे. अशा समाजात आयुष्याला अर्थ व मूल्य देणाऱ्या गोष्टी आणि (विकासाच्या) संधी यांचा सर्वांना सारखा वाटा मिळेल. ते पुढे म्हणाले होते, "भारताची सेवा करणे म्हणजे येथील लक्षावधी पीडित लोकांची सेवा करणे होय. दारिद्र्य, अज्ञान व संधींची विषम वाटणी यांचा शेवट करणे, हे या सेवेचे उद्दिष्ट होय."

पुढील काही वर्षांत, विशेषत: ५४-५७ या कालखंडात, संसदेत आणि आवडी येथील काँग्रेसच्या अधिवेशनात तसेच तिसऱ्या पंचवार्षिक योजनेविषयी बोलताना, नेहरूंनी वर सांगितलेल्या विचारांना अधिक भरघोस रूप दिले. त्यांनी आपल्या उद्दिष्टाला 'समाजवादी समाजरचना' किंवा 'समाजवादी समाज' असे नाव दिले. मात्र मूलभूत गोष्टीत फेरबदल झाला नाही. कराची काँग्रेसमध्ये केलेल्या ठरावात जे म्हटले होते त्याचा समावेश भारतीय घटनेतील मार्गदर्शक तत्त्वांच्या प्रकरणात करण्यात आला होता. आता तीच तत्त्वे अधिक तपशिलवार

मांडून त्यांना एक प्रकारच्या विचारप्रणालीचे (आयडियॉलॉजी) रूप देण्यात आले.

नेहरूंचा समाजवाद हा खरे तर मानवी व सामाजिक मूल्यांपेक्षा काही निराळा नव्हता. संस्था व संरचना यांच्या बाबतीत या समाजवादाने फार लवचिक आणि बदलत्या परिस्थितीशी जुळवून घ्यायला बळ राहील, अशी भूमिका घेतली होती. कोणत्याही श्रद्धेशी (डॉग्मा) किंवा घट्ट चौकटीशी जखडून राहण्याची त्यांची इच्छा नव्हती. जमीनधारणा व कृषिव्यवस्था यांच्याबाबतची त्यांची दृष्टी, सहकारी चळवळीला त्यांनी दिलेला पाठिंबा, ग्रामीण विकास (कम्युनिटी डेव्हलपमेंट) व लोकांची स्वयंसेवी वृत्ती यांच्या विषयी त्याना (नेहरूंना) वाटणारा विश्वास यातून त्यांना मानवी व सामाजिक मूल्यांविषयी केवढी कदर वाटत होती, हे दिसून येते. औद्योगिक धोरण आणि औद्योगिक क्षेत्राची रचना यांच्या विषयीच्या त्यांच्या कल्पना यांकडे आर्थिक धोरणाचा भाग म्हणून पाहाणे पुरेसे होणार नाही; विज्ञान व तंत्रज्ञान यांच्या उत्कर्षाविषयीचे त्यांचे जे आडाखे होते, त्यांचा या विचारांवर प्रभाव होता. असे म्हणता येईल की, आर्थिक व सामाजिक विकासाबाबत त्यांनी कोणताही परिपूर्ण सिद्धान्त बांधलेला नव्हता. त्यांना असे वाटे की, आपण फक्त दिशा ठरवायची आणि भविष्यात जे अनुभव येतील त्यांच्या अनुषंगाने जे होईल ते स्वीकारायचे.

जमीनधारणा, सहकारी चळवळ व ग्रामीण-विकास यांच्या बाबतीत नेहरूंनी ज्या गोष्टींचा आग्रह धरला होता त्या देशाच्या भवितव्याच्या दृष्टीने इतक्या मूलगामी होत्या की, आपण त्यांचे भान ठेवले नाही, तर ते भवितव्यच धोक्यात येईल. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या निमित्ताने जमीनधारणेविषयी कळीची चर्चा झाली तेव्हा नेहरूंनी सामाजिक प्रगतीच्या बाजूने आपले वजन खर्च केले. जमीनधारणेवर कमालमर्यादा असावी याबद्दल त्यांची खात्री पटली होती. पूर्वी जमीनदारीचे निर्मूलन आणि कुळांना संरक्षण या मुद्यांभोवतीच चर्चा चालत असे. आता त्यांचे इतक्यावर समाधान होईना – जमीनधारणेवर मर्यादा व जमिनीची मालकी जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोचवणे या गरजेच्या गोष्टी आहेत, असे त्यांचे मत झाले होते. कूळ-वहिवाटीकडे संक्रमणातील एक टप्पा म्हणून पाहावे, असे नेहरूंचे म्हणणे होते.

तथापि जमिनीचे समान वाटप इतकेच नेहरूंचे उद्दिष्ट नव्हते. त्यांना असे वाटत होते की, जमीन-धारणेवर मर्यादा घातल्याने कृषिउत्पादनात वाढ होईल आणि ग्रामीण भागातील पैसा वाढेल. याचसाठी दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळात, विशेषतः ५७ व ६२ यांच्या दरम्यान, त्यांनी सहकाराच्या प्रश्नाकडे जास्त लक्ष्य दिले. १९५८ साली राष्ट्रीय नियोजन मंडळापुढे बोलताना ते म्हणाले की, जमीन-धारणेतील निर्बंध आवश्यक आहेतच पण त्या निर्बंधांचा फायदा सहकारी संस्था निर्माण झाल्याखेरीज होणार नाही. आचार्य विनोबा भावे यांची ग्रामदान मोहिम, व्ही.टी. कृष्णमाचारी यांचे सहकारावरील विचार आणि चीनमधील सहकारी चळवळीची मिळणारी माहिती यांचा प्रभाव पडल्यामुळेहि असेल, सहकाराविषयी नेहरूंनी खूप विचारमंथन केले. त्यांच्या हे लक्षात आले की, ग्रामीण पत सर्वेक्षण समितीने (रूरल क्रेडिट सर्व्हे) मोठ्या आकाराच्या सहकारी संस्थांचा पुरस्कार केला होता, तो बरोबर नव्हता. मोठ्या सहकारी संस्थांच्या व्यवहारात अनेक विकृती व चुका संभवतात, याची दखल समितीने घेतली नव्हती. राष्ट्रीय नियोजन मंडळाने नोव्हेंबर १९५८ मध्ये आणि नागपूर काँग्रेसने जानेवारी १९५९ मध्ये केलेले ठराव कृषिधोरणाविषयीचे संस्मरणीय ठराव आहेत. त्या वेळी प्रशासनातील विविध पातळ्यांवर, तात्कालिक हित लक्षात घेऊन जी धोरणे राबवली जात होती त्यांचे घोर परिणाम नेहरूंनी ओळखले होते, हे या ठरावांवरून दिसून येते. 'भारतीय सहकार काँग्रेस' या संस्थेसमोर एप्रिल १९५८ मध्ये नेहरूंनी एक भाषण केले. सहकार व सहकारी शेती या शेतकऱ्यांनी स्वखुशीने चालवलेल्या चळवळी झाल्या पाहिजेत व लोकांच्या अनुमतीने आणि त्यांची मने वळवून त्या वाढवल्या पाहिजेत या आशयाचे विवेचन त्यात केलेले आढळेल.

ग्रामीण-विकास (कम्युनिटी डेव्हलपमेंट) आणि त्याची वाढ होण्यासाठी आवश्यक परिस्थिती यांचे महत्त्व आपण विसरत चाललो आहोत. जवाहरलाल नेहरूंच्या दृष्टीने ग्रामीण विकासाचे महत्त्व अगदी उघड होते. (या योजनेच्या) अगदी सुरुवातीलाच त्यांनी सांगितले होते की, ग्रामीण-विकासात गाव व व्यक्ती या दोन्हीला उत्तेजन द्यावयाचे आहे. व्यक्तींनी आपल्या गावातील विकासकेंद्राची उभारणी करावयाची असून त्या द्वारे देशाच्या बांधणीला हातभार लावायचा आहे. नेहरूंनी ग्रामीण-विकासाला अखेरपर्यंत ठाम पाठिंबा दिला. त्यातूनच पंचायत राज्याची कल्पना पुढे आली. भारताच्या उभारणीत या दोहोंना असलेले महत्त्व सांगण्याची एकही संधी नेहरू दवडत

अनुक्रमणिका






नसत. भारताचे औद्योगीकरण चालले होतेच. त्याला उतारा म्हणून ग्रामीण अर्थकारणाच्या विकासाचा उपयोग होणार होता.

– ५ –

नेहरूंच्या सामाजिक व ग्रामीण विकासाच्या धोरणांचा विचार बाजूला ठेवून आपण त्यांच्या आर्थिक व औद्योगिक धोरणांकडे वळतो तेव्हा तीन गोष्टींविषयी सावध राहिले पाहिजे असे त्यांना वाटत असल्याचे लक्ष्यात येते. पहिली गोष्ट म्हणजे संपत्तीच्या उत्पादनात कमतरता पडता कामा नये. नाही तर वाटायलाच काही राहणार नाही. दुसरे, विज्ञान व तंत्रज्ञान ही औद्योगीकरणाला पायाभूत आहेत. म्हणून त्यांचा विकास होईल, अशी तरतूद केली पाहिजे. प्रा. प्रशांतचंद्र महालनोबिस यांनी ५४ सालच्या अखेरीस (पंचवार्षिक योजनेचा) जो मसुदा मांडला होता त्यातली ही कल्पना नेहरूंना फार आवडली होती. रशियात विकासाचा जो अनुभव आला, तो या कल्पनांना पुष्टी देणाराच होता. नेहरूंनी पायाभूत कारखाने आणि पोलाद, यंत्रनिर्मिती, ऊर्जा व खनिज तेल अशा अवजड उद्योगांवर भर दिला त्याचे कारण भारताच्या आर्थिक व तांत्रिक परिवर्तनाचे जे चित्र त्यांनी कल्पिले होते त्याचाच तो महत्त्वाचा भाग होता. या परिवर्तनात एका बाजूला मोठे कारखाने आणि आधुनिक यंत्रे असली तरी या परिवर्तनाचा मुख्य आधार शेती हाच होता. खेरीज लघु-उद्योग, ग्रामोद्योग आणि खादी यांनाही त्यात स्थान होते. नेहरूंना तिसरी काळजी होती ती म्हणजे हावरट (ऑक्विझिटिव्ह) समाजात जी अप्पलपोटी प्रवृत्ती असते, तिला पायबंद कसा घालायचा, ही.

नेहरूंचा उत्पादनवाढीचा जो आग्रह होता त्याचा साहजिक परिणाम म्हणून मिश्र अर्थव्यवस्था उभी राहिली. अस्तित्वात असणाऱ्या खाजगी धंद्यांच्या राष्ट्रीयीकरणाला या व्यवस्थेत नावापुरताच वाव होता. प्रसंगोपात्त एखाद्या धंद्याचे राष्ट्रीयीकरण झाले असले, तरी राष्ट्रीयीकरण एक धोरण म्हणून राबविण्याला नेहरूंचा विरोध होता. त्याचे कारण ते असे देत की, सहकारी पैसा नवीन तंत्रज्ञान वापरण्यासाठी खर्च झाला पाहिजे, जुन्या धंद्यांच्या राष्ट्रीयीकरणासाठी नव्हे. चालू उत्पादनाला खीळ बसू नये ही सावधगिरी नेहरू बाळगीत त्याचा परिणामही राष्ट्रीयीकरण एक धोरण म्हणून न स्वीकारण्यात झाला होता.

दुसऱ्या व तिसऱ्या पंचवार्षिक योजनांत नेहरूंनी पोलाद, पेट्रोल व ऊर्जा या उद्योगांवर विशेष लक्ष्य दिले. विज्ञान व तंत्रज्ञान यांचे शिक्षण देऊन त्या ज्ञानांनी युक्त असे मनुष्यबळ त्यांनी उभे केले. या दोन क्षेत्रांतील संशोधनालाही त्यांनी उत्तेजन दिले. देशातीलच साधनस्रोत वापरून आणि देशाच्या कुवतीचा उपयोग करून देशातील उद्योगांचा स्वयंपुष्ट व चतुरंग विकास होईल अशी परिस्थिती नेहरूंनी निर्माण केली. हे खरे आहे की (विकासाचे) जे अभिप्रेत संतुलन योजनेच्या आराखड्यात असे ते अंमलबजावणीत उतरत नसे. कामे वेळेवर पुरी होत नसत आणि योजना करताना जे अंदाज बांधलेले असत ते व्यवहारात खरे ठरत नसत. पण या योजनांच्या मागे नेहरूंच्या ज्या संकल्पना होत्या त्यांना तत्त्वांची व भविष्यवेधाची कसोटी लावली, तर त्या संकल्पना अशा कसोट्यांना नक्कीच उरतील.

भांडवलशाही आणि भांडवली जीवनप्रणाली यांचा नेहरूंना स्वभावत:च तिटकारा असला तरी खाजगी क्षेत्रासाठी राखून ठेवलेल्या उद्योगात ढवळाढवळ करणे त्यांना मंजूर नव्हते. अशा ढवळाढवळीने उत्पादनात अडथळा येईल व उपक्रमशीलतेला खीळ बसेल, असे त्यांना वाटे. पाश्चात्य देशातील लोककल्याणकारी भांडवलशाहीची प्रगतीशील धोरणे येथील खाजगी उद्योगांनी अवलंबिली असती, तर नेहरूंना आनंद झाला असता. लघु व मध्यम उद्योग करणारे व्यावसायिक आणि नवीन कारखानदार यांनी पुढे यावे, असेही त्यांना वाटे. परंतु यासाठी काही पावले उचलावीत, असा आग्रह त्यांनी धरला नाही. (भांडवलदारीला शह बसावा म्हणून) मूलभूत उद्योगांवर पकड ठेवणारा कार्यक्षम सार्वजनिक उद्योग विभाग उभा करणे त्यांना जास्त भरवशाचे वाटले. खाजगी क्षेत्रातील उद्योगापेक्षा सार्वजनिक उद्योग अधिक भरभराटीला येतील अशी त्यांची अपेक्षा होती. संमिश्र अर्थव्यवस्थेतून (देशाची) वाटचाल अखेर समाजवादी अर्थव्यवस्थेकडे आणि समाजवादी समाजरचनेकडे होईल, अशी आशा त्यांना वाटे.

गेल्या काही वर्षात* शेती उत्पादनात जी तूट येत आहे, त्यामुळे काही टीकाकारांना वाटते की, नेहरूंच्या प्राथमिकता चुकल्या होत्या. शेतीला जे महत्त्व द्यायला हवे होते, ते दिले गेले नाही. हे खरेच आहे की, शेतीच्या बाबतीत व इतरही काही क्षेत्रात कमतरता राहून गेल्या. त्यांनी मुख्यमंत्र्यांना बजावले होते की, मुख्यमंत्र्यांनी शेती खाते स्वत:कडे घ्यावे. त्याची दखल घेतली गेली नाही. शेतीला इतर कोणत्याही

* हा लेख १९६७ साली लिहिलेला आहे.

विभागापेक्षा जास्त महत्त्व दिले पाहिजे, हे नेहरूंचे धोरण होते व ते त्यांनी पावलोपावली उचलून धरले होते. १९५२ साली संसदेपुढे बोलताना ते म्हणाले होते, "शेतीचा पाया भक्कम नसेल, तर जी कारखानदारी आपण उभी करू पाहातो तिचा आधारही कच्चा राहील. अन्न आघाडी ढासळली तर इतर सर्व क्षेत्रातही पडझड होईल. म्हणून आपली अन्न-आघाडी कमकुवत राहता कामा नये. आपली शेतीव्यवस्था मजबूत राहील अशी आपली अपेक्षा आहे; व तसे झाल्यास कारखानदारीची प्रगती घडवून आणणे सोपे जाईल."

नेहरूंनी शेतीला महत्त्व दिले नाही हे शेतीचा विकास न होण्याचे कारण नाही. साधनसामग्री व गुंतवणूक (यांचा तुटवडा), संस्थात्मक बदल घडवून आणण्यातील व अंमलबजावणीतील हलगरज ही (शेतीचा विकास न होण्याची) कारणे आहेत. अन्नधान्याची आयात करावी लागते याची खंत नेहरूंना वाटे. १९४९ मध्ये त्यांनी वचन दिले होते की, एका वर्षात अन्नधान्याची आयात बंद होईल. पण ती आयात पहिल्या व दुसऱ्या पंचवार्षिक योजनांनंतरही बंद झाली नाही, याचे दुःख ते वारंवार बोलून दाखवीत.

– ६ –

मनुष्याने सुरू केलेले काम त्याच्या हयातीत पुरे होईलच असे नाही. एखाद्या राजकीय नेत्याची सत्ता भलेही निर्बाध असेल, पण त्याची खरी भूमिका केवळ दिशा देण्यापुरतीच असते. त्याची मर्मग्राही दृष्टी आणि त्याने जोपासलेली मूल्ये यांनी त्याने दाखवलेल्या मार्गावर प्रकाश पडतो. पण ज्या शासन-प्रणालीत तो काम करतो आणि त्याचे सहकारी व प्रशासकीय अधिकारी ज्या दर्जाची सेवा देतात त्यांच्या मर्यादेच्या पलीकडे तो फार तर चार पावले जाऊ शकतो. नेत्याचे जे विचार असतात त्यातून दिशा मिळाली तरी त्या विचारांची अंमल-बजावणी कशी होते यावरच ते विचार टिकून राहाणार की नाही, ते ठरते. अंमलबजावणी होताना अनेक घटकांचा हातभार लागत असतो. त्या घटकांचे बळाबळ, त्यांचा यशस्वी किंवा अयशस्वी वापर यावर बरेच अवलंबून असते. एकूण घटकांपैकी काहीच घटक या नेत्याच्या नियंत्रणाखाली असतात. त्या घटकांपुरती या नेत्याची जबाबदारी प्रत्यक्ष, साक्षात असते. काही घटक, ज्या परिस्थितीत नेता वावरत असतो, त्या परिस्थितीचे भाग असतात. अशा घटकांवरील नेत्याचे नियंत्रण मामुली असते.

त्यामुळे नेहरूंनी जे असाधारण योगदान दिले व यश संपादन केले त्यासाठी त्यांना आदरांजली अर्पण करताना त्यांनी भारताच्या विकासाचा जो पाया घातला आणि भारतमातेचे भव्य मंदिर उभारण्याचा त्यांचा जो संकल्प होता त्याबद्दल काही मते व्यक्त करणे अस्थानी होणार नाही; किंबहुना, सध्याच्या काळात अशी मते नोंदवणे उपयोगाचेच ठरेल. तथापि, नेहरूंच्या मृत्यूनंतर ज्या घटना घडल्या आहेत, त्यामुळे असे काही करणे अवघड झाले आहे.

नेहरूंच्या (विकास विषयक) कल्पनांचा पुरता पाठपुरावा केला गेला असता आणि त्या कल्पनांची अंमलबजावणी अधिक समतेने झाली असती, तर भारताला मोठा लाभ झाला असता. असे न होण्याला अनेक कारणे आहेत. खुद्द नेहरूंना विविध गोष्टीत रस होता व अनेक उद्दिष्टे त्यांना गाठायची होती. पण या अपयशाची जबाबदारी नेहरूंपेक्षाही त्यांचे सहकारी मंत्री, प्रशासकीय यंत्रणा, सांसदीय व संघराज्य पद्धतीत सत्तेचे झालेले विकेंद्रीकरण, राजकीय पक्षांचा, विशेषतः काँग्रेसचा, कमकुवतपणा आणि धरसोडवृत्ती या गोष्टींकडे जाते. दुसरे असे की, जसजशी अर्थव्यवस्था भरभराटीला येते आणि विकासातून नवे तणाव निर्माण होतात. तसतसे नियोजनाच्या समस्यांइतकेच महत्त्व अर्थव्यवस्थेच्या व्यवस्थापनातील समस्यांना येते. या अर्थव्यवस्थेच्या व्यवस्थापनेच्या समस्या व नियोजनाच्या समस्या एकमेकात गुंतलेल्या असतात. भारताची प्रशासन पद्धती आणि नियोजनाची प्रणाली यांचे हे दौर्बल्य आहे की, व्यवस्थापनाची काळजी या दोन्हींनी घेतली नाही. नेहरूंची जी गृहीतकृत्ये होती ती व्यवहारात पूर्णपणे उतरली नाहीत याचे एक कारण अर्थव्यवस्थापनातील हलगरज हे देखील आहे.

नियोजनबद्ध विकासाकडे पाहाण्याची नेहरूंची जी दृष्टी होती तिचा विचार करताना नेहरूंनी स्वीकारलेली मूल्ये आणि जोपासलेल्या संकल्पना एका बाजूला व व्यवहारात दिल्या गेलेल्या प्राथमिकता दुसऱ्या बाजूला, असा भेद केला पाहिजे. प्राथमिकता ठरवताना काळ, परिस्थिती, अनुभव आणि राष्ट्रीय घडामोडींचा वेळोवेळी घेतलेला आढावा यांचा परिणाम होत असतो. नियोजन सुरू होऊन आता १५ वर्षे उलटली आहेत. त्यात आपण काय मिळवले व काय गमावले, हे स्पष्ट झाले आहे. आता जर आपण अशा निर्णयाप्रत आलो असू की, आपण शेतीवर लक्ष्य केंद्रित केले पाहिजे; किंवा जेणे करून रोजगार व शिक्षण दोन्हींचा विस्तार होईल अशा योजना

करावयात; किंवा परदेशी मदत घेणे बंद करावे, तर तसे करताना आपण नेहरूंच्या आदर्शापासून दर जातो आहोत, असे मानण्याचे काहीच कारण नाही.

नेहरूंचा असा दावा कधीच नव्हता की, मी एक परिपूर्ण चित्र पुढे ठेवून कार्य करीत आहे. विज्ञान व तंत्रज्ञान यांच्या मुळे समाजहित व आर्थिक विकास यांना भरकस मदत मिळते, हे त्यांचे म्हणणे बरोबर होते. परंतु समाज रचना व आर्थिक घडी यांना मोठा धक्का न लागता तंत्रज्ञानाची प्रगती होईल, असे मानण्यात त्यांनी अवाजवी आशावाद बाळगला, असे म्हणता येईल. (हे त्यांना उमगले असते) तर त्यांनी समाज-रचनेतील बदलांना गती दिली असती आणि समाजातील विकासशील शक्तींची बांधणी केली असती. त्यांच्या नंतर आपल्या राज्यकर्त्यांपुढील समस्या त्यामुळे काहीशा सोप्या झाल्या असत्या.

देशात विघटनवादी शक्ती जोरावर आहेत हे जाणून नेहरूंनी कामगार संघटना, सहकारी चळवळ, शेतमजुरांच्या संघटना, गरीब शेतकरी तसेच विघटनवादाशी कडा मुकाबला करण्याची इच्छा व सामर्थ्य असणारे घटक अशांना पाठिंबा द्यायला हवा होता. असे केल्याने धर्मनिरपेक्षतावादी व राष्ट्रीय शक्तींना सामर्थ्य आले असते. सर्व प्रगतिशील शक्तींना एकत्र आणून एक विधायक कार्य करणारी युती त्यांना निर्माण करता आली असती. जर लोकशाही मार्गाने व शांततेने बदल घडवून आणायचा असेल तर, प्रचलित अर्थव्यवस्थेत वंचित राहिलेले गट व वर्ग यांनी (प्रस्थापितांवर) खालून दबाव आणला पाहिजे व सरकारी धोरणाची दिशा व सरकारी उत्तेजन यांनी वरून त्या दबावाला पाठबळ दिले पाहिजे, ही गोष्ट त्यांना खचितच समजलेली होती. नेहरूंच्या काळात हे दबाव पुरेसे प्रबळ झाले नाहीत याला कारण नेहरूंचा आदर्शवाद आणि त्यांनीच निर्माण केलेला (योग्य ते बदल घडून येतील) हा विश्वास. नेहरूंनी जी उद्दिष्टे ठेवली होती व जी त्यांच्या काळात प्राप्त झाली नाहीत ती आता आणखीच अवघड झाली आहेत आणि ती प्राप्त करून घेण्याची निकडही वाढली आहे. नेहरूंना हे माहीत होते की, बाजारपेठेतील बळांवर नियंत्रणे ठेवायला हवीत. त्यासाठी त्यांनी धान्याचा व्यापार सरकारच्या हातात ठेवला; पण त्याच बरोबर बाजारपेठेतील बलांना आपल्या सरकारावर प्रभाव पाडण्याची मोकळीकही ठेवली.

१९४६ साली, सत्तेवर आल्यावर काहीच दिवसांनी, त्या वेळच्या प्रशासन व्यवस्थेचे वर्णन करताना नेहरू म्हणाले होते की, प्रशासन व्यवस्थेचे तारू जीर्ण झाले आहे. वादळांनी होलपाटले आहे. ते मंद गतीने चालते व वेगाने घडून येणाऱ्या बदलांना ते सहन करू शकत नाही. ते मोडीत काढून नवीन जहाज तिथे आणले पाहिजे. पण प्रशासनव्यवस्थेत त्यांनी कोणतेच मूलगामी बदल घडवून आणले नाहीत. नवीन विचारांशी जुळवून घेण्याची जी वृत्ती नोकरशाहीने दाखवली तिलाच ते निष्ठा व कार्यतत्परता मानून चालले. नेहरूंच्या ठिकाणी अभिजात औदार्य असल्यामुळेच हे होऊ शकले.

सहकारी शेती स्वखुशीने आणि स्वसंमतीने स्वीकारावी असा संदेश देऊन त्यांनी लाखो शेतकऱ्यांना सहकारी शेतीसाठी उद्युक्त केले. त्यानंतर मात्र त्यांनी सहकारी शेतीच्या बाजूने ब्रही न काढल्याने लोकांना ती मोहीम सोडून द्यायला सवड मिळाली. आर्थिक व सामाजिक विषमता आणि झोपडपट्ट्या यांच्या वाढीबद्दल त्यांना नेहमीच चिंता वाटे; पण त्याबद्दल उपदेश करण्यापलीकडे त्यांनी काहीच केले नाही.

काय होऊ शकले असते याचे काहीसे दिग्दर्शन वर केले आहे. आणखी काही उदाहरणेही देता येतील. जवाहरलाल नेहरूंवर अनेक जबाबदाऱ्या होत्या. त्यांना काही राजकीय व प्रशासकीय मर्यादेत काम करावे लागत होते. त्यामुळे जी कामे पुरी झाली नाहीत त्यांची ही यादी आहे. ही उदाहरणे देण्यातील हेतू नेहरूंवर टीका कारावी हा नाही; तर आज आपल्या काय जबाबदाऱ्या आहेत, यांची ती यादी आहे. भारताचे स्वातंत्र्य अजून पुऱ्या अर्थाने सुफल झालेले नाही. तात्कालिक संकटे व आव्हाने यांच्या पुढे हातपाय गाळून स्वस्थ बसायचे नसेल तर येथील राजकीय प्रक्रिया सशक्त झाली पाहिजे आणि प्रशासनपद्धती नव्याने घडवली पाहिजे. नेहरूंच्या कारकिर्दीत हे काम व्हावयाला हवे होते हे सांगताना त्यामागे या गोष्टींची कबुली देण्याचा हेतू आहे. राष्ट्राच्या पुनरुत्थानाच्या प्रयत्नाला लागताना या कमतरतांची दखल घेतली पाहिजे. असे झाले नाही तर या देशाला दिशा उरणार नाही. इथे समाधान नांदणार नाही. अंतर्गत व बाह्य आव्हानांना आपण तोंड देऊ शकणार नाही. हे पुनरुत्थान घडविताना नेहरूंनी देशाविषयी जे स्वप्न पाहिले होते आणि देशाच्या भवितव्याचे जे विचार बाळगले होते, त्यांना मध्यवर्ती मानूनच पुढे जावे लागेल.

# संशोधनाला दाही दिशा*

**विश्वनाथ खैरे**

हे *करवीर* नगर आहे, बोलवीर नगर नाही. ज्या राजर्षी शाहूंचं नाव या नगराशी कायमचं जोडलं गेलं आहे ते *करवीरां*चे अग्रणी होते. ज्या खांडेकरांचं नाव या व्याख्यानमालेशी जोडलेलं आहे ते थोर साहित्यकार तर होतेच पण तेही करवीर होते. ते वीस वर्ष एका खेड्यातल्या शाळेत शिकवीत राहिले आणि त्याचबरोबर समाजाच्या हितासाठी म्हणून साहित्य लिहीत राहिले. नंतर ते या नगरात आले तेसुद्धा का, तर, साहित्यापेक्षा अधिक लोकांपर्यंत पोचणाऱ्या सिनेमासारख्या माध्यमातून सुधारणेच्या विचाराचा प्रसार करता यावा म्हणून. राजर्षी शाहू काय, वि.स. खांडेकर काय, आपल्या ठिकाणी राहून अडचणींची पर्वा न करता, आत्मविश्वास कधीही न गमावता, आपल्याला हवं ते प्रगतीपर कार्य करीत राहिले. वाचनमंदिर हे करवीराला विचाराचं पाठबळ आणि कृतीचं मनोबळ मिळवून देतं. ब्रिटिश म्युझियमच्या वाचनमंदिरानं मार्क्स, सावरकर, आंबेडकर यांच्यासारख्या करवीरांच्या शक्ती आणि क्षमता जोपासण्यात मदत केली. याही वाचनमंदिरात असे करवीर झाले असतील; त्यांची माहिती मंदिरानं जनतेला जरूर करून द्यावी.

'संशोधनाला दाही दिशा' असा जो विषय मी निवडला आहे त्याच्याशी या सर्व उदाहरणांचा नाळेचा संबंध आहे. संशोधन हाच मुख्य उद्देश असल्यामुळे वाचन आणि वाचन मंदिर यांची कास मूलभूत ज्ञानाच्या प्राप्तीसाठी धरायलाच हवी. ते आपापल्या ठायीच करायचं आहे म्हणून राजर्षी शाहू आणि खांडेकर यांची उदाहरणे मार्गदर्शक होत राहतील. राजपदावरचे शाहू आणि शिक्षकपदावरचे खांडेकर यांनी आपण कोणत्या पदावर आहोत याची तमा बाळगली नाही. आपण सामान्य जन राजपदावर कधीच जाणार नाही, शिक्षकाच्या पदावर जाऊन कदाचित एकाच पदावर पुष्कळ काळ राहू. सगळेच काही शिक्षक होऊ शकत नसल्याने दुसऱ्याही कुठल्या पदावर किंवा व्यवसायात असू. ते काही असलं तरी आपली कुतूहलवृत्ती, जिज्ञासा जतन करू; आहो तिथं शोधबुद्धीनं पाहत, ऐकत, नोंदत राहू असं मनाशी ठरवलं, तर आपला आणि समाजाचा असा दुहेरी फायदा होईल. आपला मेंदू नित्य नवीन काही करीत राहिला तर तल्लख राहतो आणि आपल्याला समाधानी ठेवतो. आपल्या कृतीतून समाजाच्या संचितात काही भर पडते. आपल्या आधीच्या पिढ्यांनी त्यांची देन दिली तिच्या इमल्यावर राहो, मोकळ्या जागेवर तरी एकादीअर्धी वीट आपण मांडू शकू.

"हे आम्ही ऐकत आलो आहोत, तुम्ही नवीन काय सांगता?" असा प्रश्न तुमच्या मनात आला असेल तर तो दाबून ठेवू नका. सौजन्यामुळं तुम्ही त्याचा उच्चार करीत नाही आहात हे जाणून मीच थोडं अधिक स्पष्टीकरण देतो. कुतूहल, जिज्ञासा असे शब्द ऐकले की विज्ञान, तंत्रज्ञान वगैरे परवलीचे शब्द आपल्या डोळ्यासमोर येतात. मग त्यांची ती निरखणं, त्या प्रयोगशाळा, ती महागडी उपकरणं वगैरे संभार कल्पनेत पुढे येऊ लागतो आणि मनावर मोठा दबाव आणून आपल्याला नाउमेद करू लागतो. मी स्वतः नागर इंजिनीयरीत समाधान वाटण्यासारखं काम केलं असलं तरी त्या दबावाचा अनुभव घेतलेला आहे. त्यामुळं यासारख्या नुसत्या भुवया उंचावणाऱ्याच नव्हे तर आर्थिक लाभसुद्धा अधिक प्रमाणात मिळवून देणाऱ्या जीवनवाटांच्या बाहेरून जे चालताहेत त्यांची तर घुसमटच होऊ शकते याची मला कल्पना आहे. शिवाय जिज्ञासेची महती सांगणारे पुढच्याच वाक्यात सांगत असतात की, आजची शिक्षणपद्धती जिज्ञासेला मारक आहे.... वगैरे, म्हणजे शिक्षणाचाही जिज्ञासेला काही उपयोग नाही असं झालं.

तरी मीही इंजिनीयरी प्रकल्प करीत असताना प्रचलित पद्धतींमध्ये काही संशोधन करीत होतो आणि गेली पंचवीस वर्षे भाषा, संस्कृती, पुराणकथा या विषयांचे संशोधन करीत आहे. त्याच अनुभवाच्या आधारावर आजचे चार शब्द बोलणार आहे.

* करवीर नगरवाचन मंदिराच्या वि.स. खांडेकर व्याख्यानमालेत १७.०१.२००४ रोजी केलेले भाषण

अनुक्रमणिका






**सामान्य माणूसही संशोधक**

प्रथमच मला हे सांगितलं पाहिजे की संशोधन किंवा कोणत्याही विषयात काही नवं शोधणं यासाठी अतिमानवी बुद्धी लागते असं नाही. साधी गोष्ट आहे, त्यासाठी अतिमानवी बुद्धी लागत असती तर हजारो वर्षे मानवप्राण्यांनी संशोधन करून एवढी संस्कृती उभी केली ते कसं झालं असतं? मानवातच काय, आताच्या संशोधनानुसार इतर प्राण्यांतही जो मेंदू असतो त्याची शक्ती संशोधनाला समर्थ असते. त्या संशोधनाची मात्रा कमी जास्त असेल पण त्यांच्यापुरतं ते संशोधनच असतं आणि त्यांच्या जीवनव्यवहाराला ते उपयोगी असतं. आपण कोणीच या स्थितीला अपवाद नाही. मानवसमाजात एकमेकांच्या कार्याची आणि कार्यक्षमतेची सारखी तुलना चाललेली असते त्यामुळे लहानमोठेपणाचे गंड निर्माण होत असतात इतकंच.

इथं मला या करवीर नगरीतलीच जुन्या काळातली, सामान्य माणसाचं महात्म्य सांगणारी गोष्ट सांगावीशी वाटते. इथल्या पहिल्या महाराणी ताराबाईंची सावत्र सून जिजाबाई तीर्थयात्रेला निघाल्या तेव्हा त्यांनी भगवंतराव अमात्य यांना नगरीची व्यवस्था पाहण्याची आज्ञा केली. त्यांनी नकार देताच 'हे काम सामान्य कुळंबिणीकडूनसुद्धा चालवता येईल' असं कळवून, गंगू, रंगू, भागू, नागू आणि लिंगू या पाच सुज्ञ कुणबिणींकडून जिजाबाईंनी ते काम करवून घेतलं. (*मराठेशाहीतील मनस्विनी : सु.र. देशपांडे*, मेहता) शिवाजी राजांच्या मावळ्यांपासून, बिनबियाची काळी द्राक्षांची 'सोनाका' जात विकसित करणाऱ्या सोलापुरच्या नानासाहेब काळ्यांपर्यंत अशी आणखी कितीतरी उदाहरणं देता येतील.

आपण आजच्या महाराष्ट्रातल्या तरुण पिढीपुरता विचार मर्यादित करू. आज या पिढीला महाराष्ट्रात कुठेही शिक्षणाची सोय झाली आहे व त्याचबरोबर सर्वत्र एकमेकांशी संबंध ठेवणं सोपं झालं आहे. मात्र या स्पर्धेच्या युगात शिक्षणाचा विषय निवडण्याचं स्वातंत्र्य कमी झालं आहे. प्रतिष्ठेचे विषय थोड्यांच्या वाट्याला येतात आणि बहुसंख्येला दुय्यम मानल्या गेलेल्या विषयांवर समाधान मानावं लागतं. वास्तविक ज्ञानाच्या क्षेत्रात लहानमोठं काही नसतं. पण जे वास्तव आहे ते लक्षात घेतलं पाहिजे आणि त्यातूनच मार्ग काढला पाहिजे.

तर वास्तव असं आहे की, मराठी भाषेचा अभ्यास हा एक असाच दुय्यम मानला गेलेला विषय झाला आहे. एका बाजूनं बहुसंख्य जनता ती भाषा बोलत असते, तिच्यात व्यवहार करीत असते, त्यामुळं तिचा पसर दिवसेंदिवस वाढता आहे. तर दुसऱ्या बाजूनं जगात इंग्रजी आणि देशात हिंदी यांचं अधिराज्य मोठं असल्यामुळं मराठीचा संकोच होत असल्याची भावना आहे. शिक्षणाच्या प्रांतात संशोधनाच्या अंगानं पाहावं तर भाषापंडितांमध्येही अशी भावना दिसते की, 'मराठीचं संशोधन करण्यासारखं फार काही राहिलेलं नाही. तिचा विकास व्हायला पाहिजे हे खरं पण त्याला भाषिक संशोधनाचा काही उपयोग होईल असं नाही.' मी सांगणार आहे ते असं की, शिक्षणप्रांतातली ही भावना खरी नाही, मराठीचं खूपखूप संशोधन होण्यासारखं आहे, त्यातून भारतीय संस्कृतीचं, आपल्या पुराणकथांचं वेगळं आणि यथार्थ आकलन होऊ शकेल. त्याचप्रमाणं, मराठीच्या विकासाला उपयोगी सामुग्रीही त्यातून मिळू शकेल. हे सांगताना मी या माझ्या पुस्तकांकडं तुमचं लक्ष अधूनमधून वेधणार आहे. कारण ती फारशी तुमच्यासमोर आली नाहीत, आणली गेली नाहीत.

माझं सांगणं शहरी तरुण पिढीलाही उद्देशून असलं तरी ते जास्तीकरून गावाकडल्या आणि मध्यम शहरातल्या तरुणवर्गाला उद्देशून आहे. कारण त्या वर्गाला, मी म्हणतो त्या संशोधनाच्या संधी शहरांहून जास्ती उपलब्ध आहेत. हे म्हणणं आपल्याला चमत्कारिक वाटेल. पण ते तसं नाही. कारण माझ्या धारणेनुसार मराठीचं संशोधन म्हणजे मराठी प्रमाणभाषेचं नव्हे तर गावागावांतून बोलल्या जाणाऱ्या भाषेचं, त्या त्या परिसराशी सांधा राखून केलेलं संशोधन होय. संशोधनाला दाही दिशा मी म्हणतो, त्या दाही दिशा या ग्रामीण आणि अर्धग्रामीण परिसरातच मिळण्यासारख्या आहेत. गेल्या पन्नास वर्षांत त्या आकसत आल्या आहेत आणि आपण जलदी केली नाही तर आणखी पंचवीस वर्षांत त्या खूपच कमी होतील.

**वरची दिशा**

या दहांपैकी आठ दिशा पृथ्वीवरच असतात त्यामुळं त्यांच्याबाबत फारशी शंका कुणाला येणार नाही. म्हणून वरची आणि खालची या दोन दिशांचा विचार आपण प्रथम करू. पायाखाली धरती आहे आणि डोक्यावरती आकाश आहे. म्हणून वरच्या दिशेला म्हणजे आकाशाकडं पाहण्याचा विचार पहिल्यांदा करू.

या आकाशात दिवसा सूर्य असतो आणि कधीतरी येणारे ढग सोडले तर दुसरं काही दिसत नसतं. रात्री मात्र तारे, ग्रह,

उल्का, चंद्र इत्यादी अनेक चमकदार गोष्टी दिसत असतात. सध्या शहरी परिसरात न दिसणारी ही वरची दिशा आहे. बिनशहरी परिसरात ती दिसत असल्यामुळे आपण पुष्कळ अंशांनी आपल्या पूर्वजांच्या अवस्थेला जवळ जातो. भूतकाळातल्या आपल्या पूर्वजांच्या धारणा, भावना इत्यादिकांची पुसट तरी कल्पना करण्यात, आपल्याला त्या पूर्वजांच्या नंतरच्या शेकडो पिढ्यांच्या ज्ञानाचा पाठिंबा आहे.

कोणत्याही रात्री आकाशात काय दिसेल हे आजकाल वृत्तपत्रांतसुद्धा महिन्याच्या पहिल्या तारखेला किंवा कोणत्या तरी पुरवणीत तज्ज्ञांनी सांगितलेलं असतं. आपल्या संशोधनाला उपयुक्त अशा काही गोष्टी मी सुचवीत जाणार आहे. त्या पुराव्यांनी काढलेल्या अनुमानांच्या पातळीवरच्या आहेत म्हणून माझं बाबावाक्य प्रमाण न मानता तुम्ही स्वतःच्या विचाराला पटेल तितकं घ्या आणि त्याची छाननीही करा.

थोडा अंधार पडल्यानंतर उत्तर दिशेला पाहिलंत तर ध्रुवाचा तारा दिसेल. काही रात्री सारखा पाहिला की, तो एकाच जागी स्थिर असतो असं लक्षात येईल. या ध्रुवबाळाची गोष्ट सांगितली आहे. तो बापाच्या मांडीवर बसला तिथून सावत्र आईनं त्याला उठवून लावलं म्हणून त्यानं देवाची भक्ती केली अन देवानं त्याला हे अढळ स्थान देऊन टाकलं. ही गोष्ट ऐकली किंवा वाचली की आपण शंका घ्यावी : खरंच असं झालं असेल का? ह्या गोष्टींचा थोडाच विचार केल्यावर आपल्याला कळतं की, हा तारा आपल्या स्थानावरून ढळत नाही हे पाहिल्यावर माणसांनी काही रूपक करून ही कथा त्याच्याबद्दल रचली आणि सांगितली.

आणि त्याच्याभोवती घड्याळाच्या काट्याच्या उलट दिशेनं फिरणारा सात ताऱ्यांचा एक समूह दिसेल. त्या समूहाला सप्तर्षी म्हणतात हे आपण ऐकून असतो. आपणही त्याला सप्तर्षीच म्हणतो. आकाशदर्शनाच्या पुस्तकात त्या सात ऋषींची नावं पण दिलेली असतात. वसिष्ठ, अत्री, अंगिरा वगैरे. आता, आपण शंका घ्यावी. हे ऋषी आहेत का? हे तर तारे आहेत. तरी त्यांना ऋषी म्हटलं आहे. वसिष्ठ आणि अरुंधती यांच्या गोष्टीसुद्धा पुराणांमध्ये सांगितल्या आहेत. त्याही मग रूपकानेच सांगितल्या असणार.

आता, ध्रुवावर अन सात ठळक ताऱ्यांवर बाळाचं अन ऋषींचं रूपक केलं, तसं दुसऱ्या कुणी दुसरंही कसलं रूपक केलं. त्या सात ताऱ्यांना जणू दोरीनं ध्रुवाच्या खुंटाभोवती फिरायला लावलंय असं एक रूपक आहे. तिकडं युरोपात या सातांच्या आकृतीला नांगर किंवा गाडीसुद्धा म्हटलंय. आपल्याकडं जुन्या लोकांनी आणखी कल्पना लढवली. हे सात तारे आपल्या देशात नित्य क्षितिजाच्या वर दिसत असतात. सकाळी सूर्योदयाच्या वेळेपर्यंत ते दिसत असतात. सूर्य हा रथातून येतो अशी कल्पना केली त्यांनी. मग तो रथ ओढणार कोण? पूर्वेला उगवणाऱ्या सूर्याच्या रथाला हे उत्तरेकडचे सात घोडे ओढताहेत अशी कल्पना झाली.

जशा या सातआठ ताऱ्यांवर अनेक कल्पना लढवल्या, तशाच दुसऱ्या ताऱ्यांवरही लढवल्या असतील का? होय. कल्पना लढवल्या अन त्यांच्या कथाही सांगितल्या. मी आपल्या रामायण-महाभारतातल्या, वेदातल्या, पुराणांतल्या वगैरे अनेक कथांचा शोध घेतला आहे आणि हे दाखवून दिलंय की त्यात जी माणसं, राजे, अवतार वगैरे म्हणून धरली आहेत ती मुळात कशाकशावरची रूपकं आहेत. राम-लक्ष्मण, बलराम-कृष्ण ही चंद्राच्या तेजस्वी आणि डागाळ भागावरची रूपकं; पंचवटी, कांचनमृग ही रोहिणी अन मृग नक्षत्रावरची रूपकं; राक्षस म्हणजे ढगांवरचं रूपक, सीता हे उल्केचं म्हणजे आकाशातून खाली येऊन जमिनीत घुसणाऱ्या अशनीचं रूपक... वगैरे. ते सगळं सांगत बसत नाही. तुम्ही वरदिशेला बघायला लागतात, तारकापुंजांना ओळखायला लागलात की त्यांच्या आकृतींवर, उगवण्यामावळण्याच्या वेळांवर आणि खेळांवर कशा कथा रचल्या गेल्या आहेत हे तुमचे तुम्हाला पटायला लागेल. मग पुराणकथांमध्ये सांगितलेल्या वर, शाप, चमत्कार, लढाया, या सगळ्यांच्या मुळाशी खऱ्या झालेल्या घटना किंवा इतिहास नसून मिथ्यकथा आहेत हे लक्षात येईल आणि खरोखरी इतिहास काय आहे याचा शोध घ्यायची इच्छा होईल. या कथांच्या आधारावर आज ज्या लढाया खेळतात त्यांचा फोलपणाही लक्षात येईल.

### खालची दिशा

खालच्या दिशेला सगळी धरणी आहे. पण आपण त्या सगळ्या धरणीचा विचार करण्याचा अगोचरपणा करणार नाही. आपण ज्या गावात राहतो तेवढ्याचाच विचार करून सुरवात करू या. आपल्या गावाला काही नाव असतं. त्या नावाला काहीतरी अर्थ असणारच ना! महाराष्ट्रातल्या गावांची नावं म्हणजे मराठीतली असं आपण धरून चालतो. जसं कोल्हापूर या

गावाच्या नावात कोल्हा हे प्राण्याचं मराठी नाव आहे मानून शं.गो. तुळपुळ्यांसारख्या विद्वान संशोधकांनी हे प्राणिवर्गावरून आलेलं नाव असं म्हटलं. पण नगराला कोल्ह्यावरून नाव काहो पडावं – अशी शंका आपण घ्यावी. मग या किंवा इतरही स्थळनामांचा आपला अभ्यास किंवा संशोधन सुरू होईल.

आपल्याकडं पूर्वीच्या प्रथेनुसार या नावांच्याही पुराणकथा रचल्या आहेत. मागं कोल्हापूर-वर्णनात मी वाचलं की या ठिकाणी कोलासुराला विष्णूने लढाईत मारलं म्हणून ते नाव पडलं. वरदिशेच्या ताऱ्यांना ऋषीबिषी केलं तसं कोल्हापूर नावातल्या 'कोल्हा'चा कोलासुर केला अन आख्यान रचलं. त्यामुळं त्या ताऱ्यांवरच्या मिथ्यकथांना जसं इतिहास म्हणता येत नाही तसंच या स्थळनामांच्या कथांवरही विश्वास ठेवता येत नाही.

स्थळनामाचा अभ्यास म्हणजे काय? मुळात धरणीवरच्या सगळ्या स्थळांना नावंच नसतात. ज्याला असतं त्याचं ते स्थळनाम हे काही खडकासारखं जमिनीवर लिहून आलेलं नसतं. माणसांनी दिलेलं असतं. म्हणून स्थळनामाचां अभ्यास म्हणजे खरं तर *ज्याला नाव आहे अशा स्थळाचा अभ्यास*. त्या स्थळाची स्वाभाविक रचना, त्याचा माहीत असला तर इतिहास, त्यातले कोरीव लेख, काही खनित करून शोधलं असलं तर पुरातत्त्व अशा अनेक बाबींचा विचार करून नावाचा अर्थ लावावा लागतो.

मी महाराष्ट्रातल्या स्थळनामांचा जो अभ्यास केला आहे त्यातून अनेक नावांचा उलगडा होतो. त्यातल्या भाषाविषयक तपशिलात मी आत्ता जाणार नाही. इतकंच सांगतो की, या मुलखात पूर्वी जी बोली प्रचारात होती तिच्यात 'कोल्ला' या शब्दाला 'हिंसा न करणारा' असा अर्थ होता. त्यामुळं हे जैनांचं गाव होतं असं कळून येतं. कोल्ह्याशी त्याचा काही संबंध नाही.

पुण्याच्या हद्दीत सांगवी नावाचं एक पूर्वीचं खेडेगाव नदीच्या काठावर वसलंय. तुळपुळ्यांनी त्याचा संबंध बौद्धांच्या 'संघा'शी लावलाय. या संबंधाला आधार फक्त सारख्या ध्वनीचा. गंमत अशी आहे की, तुमच्याजवळच नदीच्या काठावरच सांगवीसारख्याच ध्वनीचं सांगली गाव आहे. ऐतिहासिक कागदपत्रात त्याचं नाव 'सांगडी' असं सुद्धा आलंय. आमच्याकडं शिवाजीमहाराजांच्या सुपे परगण्यात विहिरीचं पाणी पार निघालं की 'सांगळा' निघाला असे म्हणतात. नदीतल्या वगैरे पाण्याचा 'थांग' लागत नाही असंही आपण म्हणतो. हा सगळा विचार केला म्हणजे आपण म्हणू शकतो की, सांगवी, सांगली, सांगोला अशा नावांची नदीकाठची गावं ही नदी पार करण्याच्या 'सांगडी'च्या जागा होत्या, कारण त्या ठिकाणी नदीचा थांग नजीक लागत होता.

लक्षात घ्या की, आपण गावरान बोलीतल्या शब्दांवरून या निष्कर्षाला आलो. खालदिशेला आपापल्या जागी संशोधनाला वाव आहे असं जे मी म्हणतो ते या भाषिक परिसराच्या फायद्यावरून. आपापल्या गावाचंच नव्हे तर गावातल्या शेतावाड्यांची, ओढ्यानाल्यांची नावंसुद्धा आपल्या संशोधनाची वाट पहात आहेत. आपण त्यांच्या नोंदी करा, त्यांच्याविषयीच्या लोकसमजुती, लोककथा गोळा करा, त्यांच्यावर विचार करा आणि सत्याचा शोध घ्या. तीन वर्षांपूर्वी शिवाजी विद्यापीठात मराठीच्या प्राध्यापकांच्या उद्‌बोधनवर्गात मी पुराणकथांवर तीन व्याख्यानं दिली होती. त्यावेळी वर्गात सहभागी झालेल्या पन्नास प्राध्यापकांचे नावपत्ते घेतले. त्यांत कितीतरी गावांची नावं, आडनावं अशी होती की त्यांचा सहज बोध होत नव्हता. मी त्या मंडळींना विनंती केली होती की आपापल्या गावांबद्दलच्या लोककथा गोळा करा. त्या विनंतीला प्रतिसाद अगदीच मिळाला नाही. आज तीच विनंती मी आपणां सर्वांना करीत आहे. संशोधनाच्या दहा दिशांपैकी ही एक दिशा आहे. ती तुम्ही घेतलीत तर संशोधनाची एक वाट तुम्हांला मिळेल.

### राहिल्या आठ दिशा

राहिलेल्या आठ दिशा धरती आणि अस्मान यांच्यामध्ये येतात. धरतीवरचा आपला वावर त्यांच्यांत होत असतो. सारा निसर्ग तशीच सगळी संस्कृती याच आठ दिशांना पसरलेली आहे. आपल्या जीवनाचा आधार असलेली हवा याच प्रदेशात आहे. ही हवा आपल्या जीवनाचाच नाही तर आपल्या साऱ्या संस्कृतीचासुद्धा मूल आधार आहे. कारण हवा नसती तर बोली नसती आणि बोली नसती तर संस्कृती नसती. त्यामुळे आपल्याठायी आपल्याला आठ दिशांना संशोधन करायला बोली हा एक उत्तम विषय आहे. आपली बोली आपण एक वर्षाच्या वयातच शिकलेली असते हे लक्षात घेतले तर आपल्याजवळ शिकण्याची निसर्गदत्त क्षमता किती जबरदस्त आहे याची जाण येऊन, संशोधन ही फार कठीण गोष्ट आहे असं आपण मानणार नाही.

बोली हे समाजाचं संचित असतं. बोली ही प्रमाणभाषेच्या आधीची असते. ती अडाण्यांनी सिद्ध केलेली असते. बोलीतले शब्द व्याकरणकारांनी किंवा भाषाशास्त्रज्ञांनी बनवलेले नसतात. बोलीला तिचं स्वतःचं व्याकरण असतं. या सगळ्या गोष्टी सहज दिसणाऱ्या आहेत. मराठीच्या परंपरागत भाषाशास्त्रीय अभ्यासात त्यांचं भान दुर्दैवानं सुटलेलं आहे. अलीकडे या गोष्टींचा उच्चार आधुनिक भाषाविज्ञानाची देन म्हणून होत असतो. मात्र मराठीची उत्पत्ती संस्कृत भाषेतून झाली या परंपरागत धारणेला कवटाळूनच.

माझे संशोधन या परंपरागत धारणेबाबत शंका घेण्यातून सुरू झाले. त्यामधून मराठीचे भाषाविज्ञानाच्या अभ्यासातले तसेच भारतीय भाषांमधले मध्यवर्ती स्थानही सिद्ध झाले आहे. संस्कृतातून मराठीसारख्या इतरही भाषा निघाल्या असे म्हणण्या-ऐवजी, दक्षिणी भाषांसह सर्व भारतीय लोकभाषांमधून संस्कृतची रचना झाली असे म्हणण्याइतपत या अभ्यासाची प्रगती आता झालेली आहे.

मी एकदोनच उदाहरणे देतो. वेदात यज्ञाला फार महत्त्व आहे. यज्ञात बली द्यायच्या पशूला बांधण्यासाठी जो खांब रोवीत तो आपटा, खैर, पिंपळ, मोकर अशा झाडांचा असे. ही सारी झाडं खास भारतीय आहेत. दुधाच्या रतीबाला 'उकडा' असा शब्द आपण ऐकला असेल. त्याचा शोध घेता असे दिसते की उक्क म्हणजे दोरी या मूळ शब्दावरून, शिंकाळी, कावडीची दोरी इत्यादी अर्थांतून 'उकडा' याला हा रतिबाचा अर्थ आला. विशेष गोष्ट ही की, अशा शिंकाळीने गळ्यात अडकवलेल्या अग्निपात्राला वैदिक साहित्यात 'उखा' असं नाव आहे. काश्मीरमध्ये अजूनही कांगडी नावाची शेकोटी अशीच गळ्यात अडकतात. मराठी बोलीतल्या साध्या शब्दावरून भारतीय लोकसंस्कृतीचा शोध इतक्या मागे नेता येतो.

**संशोधनाच्या संघटनाची दिशा**

महाराष्ट्रातल्या विद्येच्या आणि संशोधनाच्या संस्थांनी या संशोधनाचा पाठपुरावा करावा असे मी पंचवीस वर्षांपासून सांगत आलो आहे. ते अभ्यासकांनी किंवा संस्थांनी फारसे मनावर घेतलेले नाही. त्या संस्थांमध्ये येणारे परदेशी अभ्यासक आपल्या बोली किंवा लोकपरंपरा यांच्या अभ्यासाकडे वळत आहेत. यावरूनही आपल्या संस्था बोध घेत नाहीत. म्हणून मी नव्या पिढीला आवाहन करीत आहे; नव्या पिढीतल्या अभ्यासकांना ठायीठायी विकेंद्रित संशोधनाची कास धरायला सांगत आहे.

मोठ्या शहरांतच अभ्यासक आहेत, संशोधनसंस्था आहेत अशी स्थिती आता राहिलेली नाही. आणि मुख्यतः, ज्यांचं संशोधन करायचं मी म्हणत आहे, त्या बोली किंवा परंपरा मोठ्या शहरांबाहेरच आपल्याला मिळू शकतात. संगणकयुगात विचारांचे दळणवळण इतके सोपे झाले आहे की, चर्चेसाठी संस्था-संमेलनांमध्ये एकत्र आलेच पाहिजे अशीही गरज निकडीची राहिली नाही. चारदोन वर्षांत, शाळेपासून संगणकाचा वापर केलेली पदवीधरांची पिढी शिक्षणक्षेत्रात वावरायला लागेल. त्या पिढीने, 'संशोधनाला दाही दिशा' मोकळ्या आहेत याची खूणगाठ मनाशी बांधून, आधुनिक तंत्रज्ञानाच्या सर्व सोयींचा फायदा घेऊन आपल्या संस्कृतीच्या आपण केलेल्या अभ्यासाची भर मानवी संस्कृतीत घालावी.

**

अनुक्रमणिका

# जीर्णोद्धार

## लेखांक २ : विज्ञानबोधाची प्रस्तावना

**श्री.मा. भावे**

- १ -

प्रा. श्रीपाद महादेव माटे (१८८६-१९५७) हे मराठी वाङ्मयातील आदरणीय लेखक. माट्यांनी १९२० सालानंतर भरघोस साहित्यनिर्मिती केली. 'उपेक्षितांचे अंतरंग' हा त्यांचा अवीट गोडीचा कथासंग्रह व्यंकटेश माडगूळकरांसकट अनेक कथाकारांना मार्गदर्शक बनून राहिला. 'माणुसकीचा गहिवर' हा त्यांचा नंतरचा कथासंग्रह देखील लक्षणीय आहे. माट्यांच्या लघुकथांचे विषय त्यांच्या काळाच्या दृष्टीने अनवट होतेच; पण त्यांची शैली देखील पांढरपेशांमध्ये वापरात नसलेल्या पण प्रसंगाशी चपखलपणे मिसळून जाणाऱ्या शब्दांच्या बिनचुक उपयोजनाने मनाला भुरळ घालीत असे. गंगाधर गाडगिळांनी माट्यांच्या शैलीचे मार्मिक विवेचन केले आहे. माट्यांनी निबंधकार म्हणूनही मोठा लौकिक मिळवला. एक काळ असा होता की, माट्यांचा लेख नसेल तर दिवाळी अंक पुरा होत नसे. साहित्य, समाजकारण, राजकारण, इतिहास अशा अनेक विषयांवर माटे सुंदर लेख लिहीत. भाषेचा ओघ, विरोधकांवर टीका करण्यातील आवेश, आपला मुद्दा पटविण्यासाठी दिलेली शेलकी उदाहरणे व केलेला समर्पक युक्तिवाद असे माट्यांच्या निबंध लेखनाचे अनेक विशेष होते. 'चित्रपट' या नावाचे रंगतदार आत्मचरित्र माट्यांनी लिहिले. या आत्मचरित्राची रंगत त्यात काही गौप्यस्फोटक प्रसंग घातल्याने आलेले नसून आपल्या काळाचा जो विश्लेषणपूर्वक आढावा माट्यांनी घेतला आहे, त्यामुळे आलेली आहे. टिळकयुगापासून गांधीयुगापर्यंत जे संक्रमण झाले ते होत असताना मध्यमवर्गाला कोणते मानसिक धक्के पचवावे लागले त्याचे संगतवार विवेचन माट्यांनी आपल्या या आत्मचरित्रात केले आहे.

फार जुन्या काळात माट्यांनी उपेक्षित घटकांच्यासाठी कार्य करण्यास सुरुवात केली. आज या घटकांना आपण दलित या नावाने ओळखतो. आपल्या विद्यार्थ्यांच्या सहाय्याने माट्यांनी या मागास वर्गीयांच्या वस्त्यांतून रात्रशाळा चालविल्या. अण्णासाहेब सहस्रबुद्धे हे पुढे नावारूपाला आलेले गांधीवादी कार्यकर्ते. त्यांनी सेवेचे पहिले धडे अशा रात्रशाळेत गिरविले. मात्र माट्यांना या उपेक्षितांबद्दल वाटणारी आस्था समाजवादी किंवा साम्यवादी तत्त्वज्ञानापासून आलेली नव्हती. माट्यांच्या ठिकाणी संतवाङ्मयाच्या चिंतनातून उद्भवलेला जो माणुसकीचा गहिवर होता त्याचे ते प्रकटरूप होते. 'अस्पृष्टांचा प्रश्न' हे माट्यांचे पुस्तक देखील अशा गहिवरातूनच, पण चौफेर चिंतनानंतर निर्माण झाले होते.

माटे हे प्रथम पुण्याच्या नू.म.वि. मध्ये व नंतर स.प. महाविद्यालयात शिक्षक होते. त्यांची वक्तृत्वपूर्ण व रसाळ व्याख्याने, त्यांचे छाप टाकणारे व्यक्तिमत्त्व, विषय चहू अंगांनी उभा करून दाखविण्याचे त्यांचे कौशल्य यामुळे विद्यार्थी भारावून जात. विद्याधर पुंडलिक, शांता शेळके या त्यांच्या विद्यार्थ्यांनी त्यांची उत्तम व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत. आचार्य अत्रे हे माट्यांचे समकालीन व विरोधकही. आचार्य अत्र्यांच्या 'ब्रँडीची बाटली' या चित्रपटातील आक्षेपार्ह भाग काढून टाकावा यासाठी माट्यांनी मोठी चळवळ पुण्यात उभी केली. सेन्सॉरने चित्रफितीतील तो भाग कापून टाकला. त्या वेळी अत्रे व माटे यांच्यातील वाद कळसाला पोचला. माटे मनाने मोठे असले तरी त्यांच्या व्यक्तिमत्वावर सनातनी संस्कारांचा पगडा आहे, असे अत्र्यांचे मत होते. अत्र्यांच्या 'दुर्वा आणि फुले' या पुस्तकात माट्यांवर एक सुंदर लेख आहे.

माट्यांची आणखी कामगिरी म्हणजे त्यांनी विविध वाङ्मयप्रकल्प योजिले व विद्यार्थ्यांच्या सहाय्याने सिद्धीस नेले. 'केसरी'ला पन्नास वर्षे पुरी झाली तेव्हा त्यांनी 'केसरीप्रबोध' नावाचा ग्रंथ तयार केला. 'केसरी'ने आपल्या कारकिर्दीत मराठी समाजजीवनातील निरनिराळ्या अंगांवर शेकडो लेख प्रसिद्ध केले होते. त्या त्या विषयावरील लेखांचे सार काढून त्या विषयावरचा एक बांधीव लेख तयार करायचा, असा हा उपक्रम होता. मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिण्याची महत्त्वाकांक्षी योजना माट्यांनी आखली होती. त्या वेळी त्या योजनेवर पुष्कळ वाद झाले. आज महाराष्ट्र साहित्य परिषद मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहवून घेत आहे, त्या योजनेचा उगम असा माट्यांपर्यंत नेऊन भिडविता येतो.

अनुक्रमणिका

१९३२ साली माट्यांनी हाती घेऊन तडीस नेलेला महत्त्वाचा प्रकल्प म्हणजे 'विज्ञानबोध' हा ग्रंथ होय. निरनिराळ्या विज्ञानांवर तज्ज्ञांकडून त्या विज्ञानाची सर्वांगीण माहिती देणारे लेख त्यांनी तयार करून घेतले व हा ग्रंथ संपादित केला. त्याला माट्यांनी दोनशे पानांची विस्तृत प्रस्तावना लिहून 'घरा-घरातून विज्ञानाचे वारे वाहायाला हवे' असा उद्घोष केला. ही प्रस्तावना त्यावेळी गाजली आणि विद्वानांनी त्या प्रस्तावनेची तोंड भरून स्तुती केली. पुढे १५ वर्षांनी ही प्रस्तावना 'मॉडर्न बुक डेपो'ने स्वतंत्रपणे प्रसिद्ध केली. त्याची साडेतीन रुपये ही किंमत त्या वेळेच्या मानाने जास्तच होती.

– २ –

महाराष्ट्रात विज्ञानाची गाठ येथील राष्ट्रवादी विचारांशी फार पूर्वीपासून बांधली गेली होती. १९व्या व २०व्या शतकांच्या सांध्यावर येथील सुशिक्षितांना स्वातंत्र्याखेरीज दुसरा विचार सुचत नव्हता. शिक्षण, इतिहास-संशोधन, विज्ञान, वृत्तपत्र-संचालन इत्यादि सर्व विषयांचा संबंध अंतिमतः देशाच्या स्वातंत्र्याशी जाऊन पोचत असे. इतिहासाचार्य राजवाडे यांनी वारंवार व आग्रहपूर्वक सांगितले होते की, मराठ्यांचा इंग्रजांशी लढताना पराभव होण्याचे कारण इंग्रजांपाशी लांब पल्ल्याच्या तोफा होत्या व आमच्याकडे त्या नव्हत्या, हे होय. इंग्रज व सुधारक यांच्याकडून असे सांगितले जात असे की, भारतीय समाज हा मागासलेला, जातिभेदांनी पछाडलेला, अंधश्रद्धात रुतलेला आणि रूढींनी ग्रासलेला असल्याने परकीयांचा गुलाम बनला. या आत्मनिंदेवर उतारा म्हणून पूर्वगौरवी राष्ट्रवादाचे उपासक असे सांगत की, हिंदुस्थान इंग्रजांच्या ताब्यात जाण्याचे अंतिम कारण इंग्रजांकडील सुधारलेली शस्त्रे हे होते. शस्त्रांच्या शोधाचा व विज्ञानाच्या उपासनेचा निकटचा संबंध आहे. म्हणून इथे विज्ञानाचा अभ्यास झाला पाहिजे.

माट्यांनीही विज्ञानबोधाच्या प्रस्तावनेत हा राष्ट्रवादी युक्तिवादच सुरुवातीला मांडला आहे. 'आपली राज्ये गेली आणि त्यांची आली, असे जेथे जेथे झाले तेथे आपल्या पराभवांची मीमांसा करताना इतिहासकारांनी व साध्या निरीक्षकांनी आपल्या सामाजिक व मानसिक कमकुवतपणास दोष दिला आहे. या कमकुवतपणाने आपल्या पराभवाचे काम सोपे झाले, असे म्हणण्यात थोडे बहुत तथ्य असेल; पण इतिहासातील उत्पातांच्या परीक्षणावरून असे दिसते की, ज्याचे मारक शस्त्रांचे ज्ञान मोठे तो इतरांहून वरचढ ठरतो... इंग्रज आपल्या पेक्षा जास्त चांगला लढवय्या होता व आपण भित्रे होतो. हे त्यांचे अनुमान चुकीचे आहे. इंग्रजांच्या हातातील हत्यार आपल्या शिपायांच्या हातातील हत्यारापेक्षा अधिक पल्लेदार व दुरूनच अधिक शीघ्रपरिणामी होते, हे खरे आहे." (पान २-३). (शुद्धलेखन नवीन नियमांशी जुळवून घेतले आहे.)

परंतु राष्ट्रवादाने विज्ञानाच्या उपासनेला दिलेली प्रेरणा केवळ शस्त्रास्त्रांच्या हव्यासापुरतीच मर्यादित नाही. 'केवळ आपल्या सुखसोयी वाढविण्यासाठी म्हणूनच नव्हे तर इतर लोकांच्याही बुद्धिदृष्ट्या आपण बरोबरीचे आहोत हे सिद्ध करण्यासाठी ते लोक ज्या क्षेत्रात कामे करीत असतील तेथील कामे करण्यासच आपल्या बुद्धिवंतांनी झटले पाहिजे. त्यांच्या सर्व शास्त्रज्ञांना जी कल्पना सुचली नाही किंवा अडली आहे तीच आपल्या येथील एखाद्या शास्त्रज्ञाला सुचली किंवा त्याने ती उकलून दाखविली व अशा रीतीने जगताच्या ज्ञानसंग्रहात त्याने काही नवी भर घातली तर आपल्या देशाच्या बुद्धिमत्त्वाचा प्रत्यय त्या राष्ट्रांना अधिक जलदीने येईल असे वाटते' (पान ५)

आज आपले राष्ट्रपती अब्दुल कलाम, वैज्ञानिकांचे नेते प्रा. माशेलकर इत्यादी देशातील जनमत तयार करणारी नेते मंडळी देशात विज्ञानाचे वातावरण करीत आहेत. त्याचा परिणाम दिसून येतो आहे. वर्तमानपत्रातून विज्ञानाची व वैज्ञानिकांची माहिती देणारे खास लेख प्रसिद्ध होत असतात. असे लेख लिहिणारी होतकरू व मुरलेली लेखक मंडळी आता तयार झाली आहे. दूरचित्रवाणीवर देखील विज्ञानाची माहिती देणारे खास कार्यक्रम दाखवले जातात. जे प्रयोग प्रत्यक्षात करून पाहता येत नाहीत अशांच्या नकला दाखवणाऱ्या संगणक-फिती तयार होत आहेत. अगदी तालुक्याच्या ठिकाणी देखील विज्ञान-प्रदर्शने भरतात. त्यात शाळांतील टवटवीत मुले हिरीरीने भाग घेतात. विज्ञानात लागणारी उपकरणी स्वतः तयार करून मांडतात, हे आपण पाहातो आहोत. २०२० सालापर्यंत भारत एक वैज्ञानिक राष्ट्र बनले पाहिजे, आर्थिक महासत्ता म्हणून हा देश पुढे आला पाहिजे, असे सांगितले जाते. नेमका हाच उपदेश माट्यांनी ७० वर्षांपूर्वी केला होता. 'केवळ काव्य-नाटकांवर सुशिक्षित मनाचा जो गुजारा होतो त्याच्या ऐवजी, किंवा निदान त्याच्या जोडीला शास्त्रज्ञानाचा खुराक अभ्यासू मनाला पोचविला पाहिजे. प्रत्यही घरी येणाऱ्या वाङ्मयाच्या

द्वाराच हे काम व्हावयास हवे. घरातले वडील-माणसांचे बोलणे, चर्चा करणे, बाजारातून वस्तू विकत आणणे, या कामात सुद्धा शास्त्रज्ञानाची आवड दिसू लागायला हवी, म्हणजे मुलाबाळात ती आपोआप उतरेल – घरचे वारेच बदलले पाहिजे.' (पान ५)

– ३ –

गेल्या वीस वर्षात विज्ञानाच्या विचार-प्रक्रियेने जरी नाही तरी विज्ञानाने निर्माण केलेल्या सुखसोयींनी आपल्या जीवनाला चोहीकडून स्पर्श केला आहे. त्यामुळे विज्ञानाचे महत्त्व निदान शिक्षितांना तरी आवर्जून पटवावे, अशी गरज उरलेली नाही. पण गेल्या शतकाच्या तिशीत परिस्थिती फार वेगळी होती. आज दूरदर्शन, संगणक, स्वयंपाकाचा गॅस या गोष्टी घरा-घरातून पोचल्या आहेत. त्या वेळी या गोष्टी कोणाला माहीतही नव्हत्या. टेलिफोन, रेडिओ यांचे शोध लागले होते खरे, पण महाराष्ट्रातील शहरातूनही या अपूर्वाईच्या वस्तू होत्या. मंदीच्या फटक्याने आर्थिक व्यवहार साकळले होते. घरोघरी सुशिक्षित बेकार झोपा काढीत किंवा पत्ते कुटीत दिवस घालवीत होते.

अशा वेळी भविष्याविषयीची घोर चिंता आणि कोणत्याही नवीन विचाराचा किंवा वस्तूचा उपहास हे महाराष्ट्रातील मध्यमवर्गाच्या मानसिकतेचे विशेष झाले होते. बरे, महाराष्ट्रातील पारंपरिक विचारसरणीही निराशावादाला खतपाणी घालणारीच होती. हे कलियुगाचे दिवस आहेत. अनाचार, अधःपात व अनीतिमय आचरण ही या युगाची वैशिष्ट्येच असतात. धर्महीन आचरण, परंपरेचा अनादर यातून अनीतीला प्रोत्साहन मिळते. सारांश, ऐहिक जीवनात आनंदाला मुळीच जागा न देणारे, असे हे युग आहे.

कलियुगाची संकल्पना बाजूला ठेवली तर मुळातच भारतीय तत्त्वज्ञान हे ऐहिकाला अनित्य म्हणून असत्य मानणारे आहे. ऐहिक हे क्षणभंगुर असल्याने त्याचा गांभीर्याने विचार करण्याची गरज नाही. नित्य, सर्वत्र पसरलेले ब्रह्म हेच काय ते सत्य असून त्याचे चिंतन व त्याचा अनुभव यातच ज्ञानाचे साफल्य असते. हे ब्रह्मज्ञान झाले की, ऐहिकाचे ज्ञान क्षुद्र भासू लागते, अशी परंपरागत विचारसरणी आहे. कीर्तने, पुराणे, प्रवचने, संतवचने यांच्या दाराने आजही समाजाच्या मोठ्या हिश्श्यावर या विचाराचा पगडा असल्याचे आपल्याला आढळते; मग पाऊणशे वर्षांपूर्वी स्थिती किती बिकट असेल, याची कल्पनाच केलेली बरी.

'विज्ञानबोधाच्या प्रस्तावने'चे त्या काळाच्या संदर्भात महत्त्व असे की, परमार्थाचे गाठोडे खुंटीला लावून ऐहिकाची साधना करावी, असा हिरीरीचा उपदेश तीत माट्यांनी केला. माटे हे मान्य करतात की, ज्यांनी परमार्थाचा ध्यास घेतला, तपश्चर्या केली, साक्षात्कार ज्यांना झाला ते सारेजण भ्रान्त किंवा अप्रामाणिक नक्कीच नव्हते. त्यांच्या पैकी अनेक जण प्रामाणिक होते, चिकित्सक होते, त्यांची अशी खात्री होती की, अनित्य अशा सृष्टीला नित्य अशा ब्रह्माचा आधार आहे आणि त्या ब्रह्माचा अनुभव आपण घेतला आहे. त्याचा या पारमार्थिकांना परमावधीचा आनंद झाला होता आणि तो आनंद इतरांना मिळावा, या परोपकारी हेतूने ते समाजात उपदेश करत फिरत होते.

ब्रह्मवेत्त्यांची ही परोपकारलालसा मान्य करून माटे असा विरुद्ध युक्तिवाद करतात की, "त्यांना निरवधी आनंद झाला तर आमची कसलीही हरकत नाही. जोपर्यंत तो केवळ अनुभवज्ञेय आहे असे त्यांचे म्हणणे आहे व जोपर्यंत आपण त्या अनुभवाकडे जाणारा मार्ग पत्करण्यास प्रवृत्त नाही तोपर्यंत त्यांच्याशी या मुद्यावर वाद घालण्याचे काहीच कारण नाही. पण जर विश्वाचा प्रश्न उलगडला म्हणून हा आनंद झाला असेल किंवा आनंदकोटीत शिरल्यामुळे विश्वाचा प्रश्न उलगडला असा हक्क ते सांगत असतील तर मात्र ब्रह्मविदांना गैरसोयीच्या अशा पुष्कळ बाबी आपल्याला विचारता येण्यासारख्या आहेत. (पान ४४). त्यापैकी पहिला प्रश्न असा की, 'जर हे सर्व ब्रह्मज्ञानी, तर यांची ब्रह्मस्वरूपवर्णने जमत कशी नाहीत?' (पान ४८). ब्रह्मस्वरूपे जर जुळत नसतील तर 'येथे दोन ज्ञानांच्या तुलनेला जागा निर्माण झाली. म्हणून या दोघांच्या सन्निकर्षाने एक कोणचे तरी ज्ञान चुकीचे ठरावे किंवा त्या दोहोंच्या मिलाफातून अधिक उन्नत असे नवे ज्ञान उत्पन्न व्हावे असा योग आता आला आहे, असे ब्रह्मवेत्त्यांस वाटावयास नको होते काय?' (पान ५०). पण या ब्रह्मवेत्त्यांनी भूमिका सोडून साक्षात्कारवाद्याची भूमिका घेतली. (तेथेच)

ब्रह्मवेत्त्यांचे म्हणणे असे असते की, आम्हाला ब्रह्म म्हणजे काय ते अनुभवाने कळले आहे आणि सृष्टीचे कोडे आम्ही उलगडले आहे. त्यामुळे आम्ही सांगतो तसे वागण्यातच सांसारिकांचे हित आहे. या दाव्यातून जो अभिनिवेश निर्माण होतो आणि लोकात पंथ माजून विद्वेषाचे थैमान उसळते तिकडे माटे वाचकांचे लक्ष्य वेधतातच; पण विश्वाचे कोडे

अनुक्रमणिका

आपण सोडवले आहे, असा दावा करणाऱ्या ब्रह्मविदांना ते विचारतात की, विज्ञान-संशोधकांना आज जे प्रश्न पडले आहेत, त्यांची उकल तुम्ही का करीत नाही?' शास्त्रसंशोधकांना इतक्या ज्या अडचणी येऊन पडतात त्यांचा परिहार करणे ब्रह्मविदांना अगदीच सोपे जाते;.... या एका सत्कृत्याने त्यांना आमची अशी खात्री पटवून देता येईल की, त्यांच्या मार्गाने गेले असता हे कोडे खरोखरीच उकलते.' (पान ६४)

यावर ब्रह्मवेत्त्यांची काय उत्तरे असतील याचा अंदाज माटे बांधतात. एक असे की, ब्रह्मवेत्त्यांच्या दृष्टीने वैज्ञानिक प्रश्न हे क्षुल्लक असून त्यावर ते आपला वेळ खर्च करू इच्छित नाहीत. दुसरे वैज्ञानिक जेथे अडले तेथे आपण मार्ग दाखवणे म्हणजे काही तरी अद्‌भुत करून दाखवल्यासारखे होईल. पण ही दोन्ही उत्तरे ना-शाबीत ठरवून माटे ब्रह्मविदांचे इंगित सांगतात की, 'त्या त्या ब्रह्मविदाच्या काळापर्यंत संसारी लोकांनी झगडून जी ज्ञाने संपादिली होती त्या पलीकडचे वस्तुजाताचे काही ज्ञान ब्रह्मविदांना होते असे वाटत नाही. (पान ६६)

– ४ –

भारतीय परंपरेने नित्य असणारे ब्रह्म आणि प्राणिमात्राच्या अन्तय शरिरात राहणारा नित्य व अमर्त्य असा आत्मा यांच्या अनुभवनिष्ठ ज्ञानाला पराकोटीचे महत्त्व देऊन अनित्य अशा संसाराला आणि भूतजाताच्या शारीरिक गरजांना क्षुद्र लेखले होते. शारीरिक सुखे ही आत्म्याला जडाशी बांधून ठेवणारी असल्याने त्यांची लालसा धरणे म्हणजे मुक्तीच्या मार्गात अडथळा निर्माण करणे होय; सांसारिक सुखे ही सुखे नसून मोक्षाच्या वाटेत पडलेल्या धोंडी आहेत. संसार हा दुःखमयच असावयाचा; आणि त्या दुःखातून सुटकेचा एकच मार्ग व तो म्हणजे संसार-त्याग असे या अध्यात्माचे एक रूप होते. या अध्यात्माचा निषेध करताना कुसुमाग्रजांनी म्हटले आहे, 'जुन्या-पुराण्या अध्यात्माचा आज नको वारसा! जिण्यावरी शतक-शतके ठेवी जो मरणाचा ठसा।।' अशा तऱ्हेच्या संन्यासलक्षी अध्यात्मावर आधारलेल्या नीतिकल्पना देखील माणसाच्या ऐहिक प्रगतीला खीळ घालणाऱ्याच होत्या. विज्ञानाने या अध्यात्माला धोका पोचतो, अशा समजुतीमुळे समाजाची धारणा अशी झाली होती की, नवीन वैज्ञानिक शोधांचा सांसारिक सुखांसाठी उपयोग करून घेताना नीती उद्‌ध्वस्त होणार नाही याची काळजी घेतली पाहिजे. ही काळजी अशा टोकाला पोचली होती की, कोणत्याही नव्या सुखसोयीचा तिटकारा हे महाराष्ट्रीय मध्यमवर्गाच्या मानसिकतेचे अविभाज्य अंग होऊन बनले होते.

माटे सांगतात की, मूळचे भारतीय तत्त्वज्ञान कधीच पारमार्थिक नव्हते. श्रीकृष्णाने गीतेत सांगितलेले तत्त्वज्ञान पार्थिवच आहे. आचार्यांनी 'जगन्मिथ्या' असे म्हटले खरे पण आचार्योत्तर पारमार्थिकांनी त्याचा 'स्वप्नवत्' असा कुभांडखोर अर्थ केला. तेव्हा समाजाचे पचन बिघडले आणि त्याच्या रक्ताचा खळखळाट मोकळेपणाने चालेना... अशा प्रकारे एका शुद्ध आणि बलिष्ठ अशा तत्त्वज्ञानाची वाताहत होऊन तेथे निर्वाळ, आत्मघातकी, मने उदास करणारे, माणसांना अंगचोरपणा शिकविणारे, बायका-मुले खोटी आहेत असे सांगणारे, शुष्क तत्त्वज्ञान आपला मांड मांडून बसले.' (पान ७३)

त्यानंतर माट्यांनी मोठ्या झोकदार भाषेत ठासून सांगितले आहे की, ऐहिकाची ओढ वाटणे नैसर्गिक आहे व संसारसुखात रमण्यात ओशाळवाणे वाटावे असे काही नाही. 'आम्हाला करावासा वाटतो, म्हणून आम्ही संसार करणार' असे बजावून माटे सांगतात की, 'हरतऱ्हेच्या आपत्ती असताना सुद्धा तो करण्यात गोडी वाटते, तर तो करण्यात काहीही गैर नाही; इतकेच नव्हे, तर तो करावयास हवा असेच ठरते'. (तेथेच). संसारात येणाऱ्या अडचणी शास्त्रीय शोधांमुळे नाहीशा होत आहेत व संसार सुखाचा होत आहे आणि ही प्रगती चालतच राहील.

शास्त्रीय शोधांमुळे लोकांच्या मनावरील धर्माचा पगडा कमी होऊन माणसे नीतीची बंधने मानेनाशी होतील व समाजात अनाचार माजेल अशी जी भीती दाखविण्यात येईल तिचा प्रतिवाद करताना माटे सांगतात की, ज्या धर्मकल्पना मुळातच कमकुवत होत्या त्या शास्त्रीय शोधांनी कोलमडतील, त्या बुडाल्याने धर्मबुद्धी संपेल, असे मानणे बरोबर होणार नाही. उलट, असे हीण जळून गेल्याने धर्मबुद्धी अधिक शुद्ध व उन्नत होईल. सृष्टीविषयीचे ज्ञान जसजसे वाढत जाईल व सूक्ष्म होत जाईल तसतशी या सृष्टीच्या कर्त्याविषयीची आमची कल्पना अधिकतर उदात्त होत जाईल. म्हणजे वैज्ञानिक संशोधनामुळे आमची भक्ती व धर्मभावना या दोन्ही गोष्टी उजळून निघतील.

या मुद्याचा समारोप करताना माटे म्हणतात की, 'धार्मिक तत्त्वज्ञानातील ज्या गोष्टी नवीन शोधांशी संगत करून सुद्धा

टिकून राहतील, त्याच खरोखर टिकून राहतील. बाकीच्यांचा लय झालाच पाहिजे व तो आपण निर्भयपणे पत्करला पाहिजे. अशी एक ईर्ष्या आपण बाळगली पाहिजे की, आमचे आम्हास ठरविण्याचा काही अधिकार नाही काय? पूर्वी माणसे शहाणी असतीलही; पण आम्ही स्वतः काय निर्बुद्ध असे जन्माला आलो आहो? जेथपर्यंत पूर्वीची ज्ञाने अप्रतिहत म्हणजे पुढून बसलेल्या माराने विव्हळ न होता उभी राहतील तोपर्यंतच ती राहू देणे बरोबर आहे. ती विव्हळ होत आहेत असे पाहताच त्यांचे युगमान संपले असे गर्जून म्हणावयास कसलीही भीती बाळगण्याचे कारण नाही.' (पान १०७)

– ५ –

भारतीय संस्कृतीला विज्ञानाचे वावडे कधीच नव्हते. रसायन, धातुशास्त्र, औषधशास्त्र, शिल्पशास्त्र अशा उपयुक्त शास्त्रां-प्रमाणेच खगोलशास्त्र, गणित अशा दैनंदिन जीवनातून काहीशा दूर असणाऱ्या शास्त्रांतही प्राचीन भारतीयांनी लक्षणीय प्रगती केली होती. बरे, हा अभिप्राय काही भारतीय संशोधकांनी स्वतःची पाठ थोपटून घेण्यासाठी दिला असे नाही. युरोपीय तज्ज्ञांनी भारतीय विज्ञानांवरील पोथ्या शोधून काढल्या. त्यांची भाषांतरे केली. त्यांतील सिद्धान्तांची सूक्ष्म चिकित्सा केली व नंतर मोठ्या नाइलाजाने अशी शाबासकी दिली. उपयुक्त शास्त्रातील आमची प्रगती तर निखालस दिसून येत होती. धातू शुद्ध करण्याच्या रीती, रोगनिदान व औषध योजना, आमच्या शिल्पकारांनी बांधलेली भव्य देवळे व खणलेली अप्रतिम लेणी ही सर्वांना पाहाण्यास मिळत होती.

ही गोष्ट खरी की, गेल्या चार-पाचशे वर्षात पाश्चात्य शास्त्रांनी फार मोठी भरारी मारली व व्यवहाराचे असे कोणतेही क्षेत्र उरू दिले नाही की जिथे विज्ञानाने काही ना काही सुधारणा घडवून आणली नाही. वस्त्रे-प्रावरणे, अन्न-पाणी, वहाने व वहातुक-व्यवस्था, दळण-वळण आणि व्यापार, लेखन व प्रकाशन यांची साधने, घरबांधणी व रस्ते अशा प्रत्येक बाबतीत माणसाचा व्यवहार अधिक सुखाचा, अधिक वेगाचा व अधिक सक्षम आणि अल्प सायासाचा कसा होईल याची व्यवस्था पाश्चात्य विज्ञानांनी घडवून आणली. 'नित्याच्या राहणीतील हरतऱ्हेच्या अडचणी शास्त्रशोधाच्या बळावर नाहीशा करून ती राहणी सुखसोयींनी कशी गजबजून सोडावी आणि 'दुःख पर्वताएवढे' नाही तर 'जवापाड'च आहे हे सिद्ध करण्याची ते कशी अहोरात्र वांच्छा करीत आहेत, हे पहाण्यासारखे आहे. देशात स्वतंत्र कल्पनांचे स्फुरण सर्वत्र चालू आहे. त्या स्फुरणाचा उपयोग आपल्या नित्याच्या गरजा भागविण्याच्या कामी कसा करून घ्यावा, हे पाहण्यासाठी माणसांनी मंडळे काढली आहेत. कोणास कोणती गैरसोय जावयास हवी किंवा नवीनच सोय व्हावयास हवी अशी पृच्छा या मंडळ्या सर्व लोकांना करतात. मग देशातील कल्पक लोकांच्या पुढे या अपेक्षित सोयी मांडून त्यांना आपले कल्पनाचातुर्य चालवावयास सांगतात व जे कोणी कल्पक लोक एखादी उत्तम कल्पना बसवितील त्यांना बक्षीस देऊन त्यांनी सुचविलेली कल्पना अंमलात आणून ती बाजारात मांडतात व नव्या सोयी समाजात फैलावून देतात. (पान १५६)

या पार्श्वभूमीवर हिंदुस्थानाने व विशेषतः महाराष्ट्राने काय करावयास हवे, असा प्रश्न साहजिक उद्‌भवतो. इतिहास-काळात महाराष्ट्राने स्वतःचे दारिद्रय निवारणाचे काम मुलुखगिरी करुन केले. नव्या युगात हिंदुस्थानाचा एक देश म्हणून विचार करताना हे स्पष्ट होते की, इथून पुढे महाराष्ट्राला मुलुखगिरीच्या सहाय्याने परप्रांतातील संपत्ती उचलून आणता येणार नाही. तेव्हा महाराष्ट्रातील गरिबी काढायचीं असेल तर आता शास्त्र-संशोधकांनी पुढे आले पाहिजे. त्याचा मार्ग माटे सुचवतात की, 'देशाभिमानी लोक ज्याप्रमाणे देशभर अखंड प्रवास करतात, महान् देशभक्तांचा संदेश गावोगाव नेऊन पोहोचवितात, इतिहासातून, पुराणातून जुन्या कल्पना काढून घेऊन त्यांचा सर्व देशभर नव्याने संचार करतात, अवश्य तर आपल्या संसाराचा उन्हाळा करून घेतात, त्याचप्रमाणे आमच्या जीविताच्या प्रत्येक शाखेत काम करणाराने केले पाहिजे. जो ज्या शाखेत असेल, ज्या ज्ञानाची झट त्याच्या चित्ताला बसली असेल ते ज्ञात स्वदेशबांधवांना पोचविण्यासाठी त्याचे निखालसपणे झटले पाहिजे.' (पान १९०) पुढे ते सांगतात की, आमचे संशोधन नुसते अनुकरणात्मक न राहता स्वतंत्र आले पाहिजे. 'शास्त्रांचा अभ्यास करणाऱ्या आमच्या येथील विद्वानांना असे विनवावेसे वाटते की, युरोपातील पंडितांनी पुस्तकात सांगितलेले ज्ञान आपल्या प्रयत्नांची गती गेली पाहिजे. ते ज्ञान स्वतंत्रपणे चालवून आम्हाला कसे फलदायी होईल याची विवंचना आपण करावी.' (तेथेच)

शास्त्राच्या अभ्यासाची चळवळच महाराष्ट्रात उभारावयास हवी. 'प्रत्यक्ष शास्त्रांचे अध्ययन हे जसे महत्त्वाचे आहे तसेच










शास्त्रांविषयीची माहिती करून देऊन विद्यार्थ्यांच्या मनाची ठेवणच शास्त्रीय करून ठेवणे हे फार महत्त्वाचे आहे. प्रत्यक्ष एखादे शास्त्र आले तर ठीकच आहे; पण निदान शास्त्रे म्हणजे काय, त्यांचे इतिहास, त्यांचे व धर्माचे चाललेले झुंज, त्यांनी मनुष्याच्या जीवितावर केलेले संस्कार, प्रत्येक शास्त्राची मुख्य प्रमेये, त्या सर्वांच्या परस्परसन्निकर्षावरून निघणारी अनुमाने इत्यादी प्रकार आपल्या अभ्यासावयाच्या प्रमुख पुस्तकातच आले पाहिजेत. हे जर झाले तर शास्त्रप्रवणता ही दिवसानुदिवस वाढत राहील.' (पान १९६) 'हे झाले तर प्रत्येक माणसाचे रोजचे बोलणे चालणे, त्याचे रागलोभ, यांना काही विशेष प्रकारची म्हणजे शुद्ध व सुलक्षण प्रकारची दिशा लागेल.... यासाठी आमच्या शिक्षणक्रमात ही वादातीत ठरलेली शास्त्रे, ज्ञाने अन्तर्भूत केली पाहिजेत; व जरकरता तेथे त्यांचा रिघाव करता येईना तर वर्तमानपत्रे, मासिके, इत्यादींच्या द्वारा व निबंध कथानके, गोष्टी इत्यादी वाङ्मयप्रकारांच्या द्वारा हे अवश्य व्हावे. प्रस्तुत 'विज्ञानबोध' याच तऱ्हेचा एक उद्योग आहे.' (पान १९७-९८). 'विज्ञानबोध' दर वर्षी प्रसिद्ध करावे, असा मनोदयही माट्यांनी व्यक्त केला आहे.

**

---

## लेखक परिचय

❖ **श्री.मा. भावे** : प्राध्यापक, आय.आय.टी. पवई, मुंबई; गणित व तत्त्वज्ञान या विषयाचे ज्येष्ठ अभ्यासक. या विषयांशी संबंधीत २५ शोधनिबंध प्रसिद्ध. शिक्षक चळवळीत सहभाग. **पत्ता** : ३३/२०, ४थी गल्ली, प्रभात रोड, पुणे ४११ ००४.

❖ **विश्वनाथ खैरे** : केंद्रीय सार्वजनिक बांधकाम खात्यातून अभियंते म्हणून निवृत्त; संस्कृत, मराठी, तमिळ या भाषांच्या आंतरसंबंधाचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, महाकाव्ये-पुराणे, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांमध्ये वैशिष्ट्यपूर्ण मौलिक लेखन; *एकलव्य, युरेका, वंशाचा व्यास* (नाटके), *भारतीय मिथ्यांचा मागोवा, ज्ञानेश्वरांचे चमत्कार* इत्यादी ग्रंथांचे कर्ते. **पत्ता** : ३७४, सिंध सोसायटी, पुणे ४११ ००७.

❖ **म.द. हातकणंगलेकर** : ज्येष्ठ मराठी लेखक व समीक्षक. इंग्रजीचे भूतपूर्व प्राध्यापक व प्राचार्य विलिंग्डन महाविद्यालय, सांगली; आदर्श महाविद्यालयीन शिक्षक म्हणून महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार; उत्कृष्ट वाङ्मय निर्मितीसाठी राज्य शासनाचा पुरस्कार. 'साहित्यातील अधोरेखिते', 'मराठी कथा : रूप आणि परिसर' इ. महत्त्वाचे समीक्षा ग्रंथ. **पत्ता** : 'निर्वेद', कुपवाड रस्ता, विश्रामबाग, सांगली ४१६ ४१५.

❖ **प्रा. देवेन्द्र इंगळे** : मुळजी जेठा महाविद्यालय, जळगांव येथे इतिहासाचे व्याख्याते. विविध चर्चासत्रांत सहभाग व निबंध वाचन. **पत्ता** : मुळजी जेठा महाविद्यालय, जळगांव ४२५ ००२.

अनुक्रमणिका

पुस्तक-परिचय

# कुणा यात्रिकाचा जीवन संवाद – डॉ. वि.रा. करंदीकर

प्रा. म.द. हातकणंगलेकर

कुणा यात्रिकाचा जीवनसंवाद डॉ. वि.रा. करंदीकर, स्नेहल प्रकाशन, पुणे ३०, प्रकाशनवर्ष २००३, पृष्ठे ६६१; किंमत रु..६००/-.

डॉ. वि.रा. करंदीकर, एम्.ए., पीएच.डी., डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सेवक, मराठीचे नामवंत प्राध्यापक व संत साहित्याचे गाढे अभ्यासक, रामकृष्ण, विवेकानंद यांचे चरित्रकार आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाचे व अध्यात्मिक लौकिक जीवनाला मार्गदर्शक असा अपूर्व संदेश विसाव्या शतकातील भारतीयांना देणारे, जगन्मान्य साधकांचे, सत्पुरुषांच्या कार्य-कर्तृत्वाचे संशोधक, भाष्यकार यांनी वयाच्या आठव्या दशकात आपले प्रदीर्घ सहाशे पृष्ठांचे आत्मवृत्त वाचकांना आणि ध्येयवादी तरूण अभ्यासकांना सादर केले आहे. हे त्यांच्या जीवनाचे साफल्य आहे हे मान्य करावयास पाहिजे. माझ्यासारख्या त्यांच्या अर्धशतकाच्या सुहृदाला या सफलतेत सहभागी होताना मोठाच आंतरिक संतोष होतो. तो औपचारिक नाही हे नमूद करतो. खरे तर तसे नमूद करावे लागू नये. काही गोष्टी मनाच्या गाभ्यात जतन करणे काही व्यक्तींना आवडते पण तशा त्या जपल्यात की नाही अशी निकटवर्तीयांना शंका येते. ती जनरीतीप्रमाणे रास्तही असते. त्यामुळे योग्यवेळी भावना व्यक्त करणे हाच उचित मार्ग ठरतो.

डॉ. करंदीकरांच्या समवेत मी १९४८ पासून मार्गक्रमणा करीत आलो आहे. त्यांनी त्या साली पुन्हा एकदा उच्च शिक्षणात उतरण्याचे ठरविले व विलिंग्डन महाविद्यालयात ज्युनिअर बी.ए.च्या वर्गात नाव दाखल केले. वसतिगृहात निवासास आले. इंटरच्या परिक्षेत मला मुंबई विद्यापीठाचे इंग्रजी विषयातले विशेष यश प्राप्त झाले असल्याने मी त्यांच्या नजरेत आलो. अन्यथा सर्व बांबतीत आम्ही वेगळे होतो. शिक्षण, जात, धर्म, परिस्थिती, निष्ठा, संस्कार, निश्चय आणि आकांक्षा या बाबतीत ते सर्वथैव निराळे होते. समान एकच होते ते म्हणजे ज्ञानाबद्दलची आस्था, त्यांची काहीशी एकमार्गी, प्रखर, आत्मक्लेशाने तेजस्वीपणाची आराधना करणारी तर माझी मध्यमवर्गीय, सुखवस्तू! माझ्या इंग्रजी विषयातल्या यशाचे त्यांना अप्रूप वाटत होते. नंतरच्या काळात त्यांचा प्रमुख विषय प्राचीन मराठी आणि राष्ट्रभक्ती असाच राहिला. या भिन्न प्रवृत्तींचा त्यांनी कधी अडसर मानला नाही. हे त्यांच्या त्या काळातल्या औदार्याचे निदर्शक होते. त्यांची कृतज्ञतेची भावना अतिशय गाढ आणि दीर्घकाल जमलेली असते. त्यांचा स्नेही म्हणून या गोष्टीचा मला अचंबा आणि अभिमान वाटतो. पूर्वायुष्यात ज्यांचे ज्यांचे त्यांना सहाय्य झाले त्यांची पुढील काळात सव्याज परतफेड करण्याचा त्यांनी मनःपूर्वक प्रयत्न केला. हा त्यांचा गुण असाधारण म्हटला पाहिजे. तशीच त्यांची हिंदु धर्म आणि हिंदू तत्त्वज्ञानावरची अविचल निष्ठा त्यांच्या दृढविश्वासाचा प्रत्यय आणून देते. मध्यंतरीच्या काळात इतर राजकीय आणि सामाजिक तत्त्वज्ञानांचा आस्थापूर्वक परिचय करून घेण्याचा त्यांनी प्रामाणिक प्रयत्न केला. (या पक्षातील आचार्य भागवतांसारख्या विचारवंतांचे आदरातिथ्य केले. रॉयवादी विचारवंत प्रा.अ.भि. शहा, प्रा. मे.पुं. रेगे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्रा. ग.प्र. प्रधान, प्रा. देवदत्त दाभोळकर यांची मैत्री संपादन केली. त्यांचे वारंवार आदरातिथ्य, आगतस्वागत केले. त्यांनी आपल्या कर्मठ हिंदुत्ववादाला मुरड घालून या प्रकारचे औदार्य दाखविले हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वामधला स्पृहणीय भाग आहे.) त्यांच्या परिचयाचे वर्तुळ जसजसे विस्तारत आणि विविध होत गेले तसतसा या औदार्याचा आविष्कार ठळक होत गेला. त्याप्रमाणे वामन पंडित, रामदास, ज्ञानेश्वर, नंतर रामकृष्ण आणि विवेकानंदांकडे ते वळले तेव्हा पाश्चात्य विद्या आणि विचारप्रणीत विवेकानंदांचा प्रभाव त्यांच्यावर खोलपर्यंत पोहचत राहिला. एकाचवेळी पाश्चात्य आधुनिकता आणि हिंदू प्राचीन अध्यात्मसरणी यांचा गौरव ते करीत राहिले. विवेकानंदांच्या नवहिंदुत्ववादाचा विचार त्यांच्या मनात बळावत राहिला. रामकृष्णांचे अध्यात्म ही हिंदूराष्ट्राची नव्याने प्रस्थापना करणारी


अनुक्रमणिका

विचारसरणी त्यांना वाटेनाशी झाली आणि विवेकानंद त्यांचे आदर्श ठरले. हिंदू तत्त्वज्ञानाची आधुनिक संदर्भात पुनःस्थापना विवेकानंदांच्या विचार, आचारातून होऊ शकेल असा विश्वास त्यांच्या ठिकाणी दृढ झाला. रामकृष्ण-विवेकानंदांचे चरित्र त्यांनी तपशीलात अभ्यास करून सिद्ध केले. या महापुरूषांच्या निवासांना साधनाश्रमांना त्यांनी भेटी दिल्या. त्यांची आराध्यदेवता कालीमातेच्या महात्म्याचा मागोवा घेतला. रामकृष्ण विवेकानंदांच्या शिष्यपरिवाराचा आणि परंपरेचा इतिहास परिश्रमपूर्वक सादर केला. ही विभूती आणि तिचा इतिहास परीकायांना ज्ञात व्हावा म्हणून त्यांचे इंग्रजीत अनुवाद करविले. याच्या कृपाप्रसादादाखल इंग्लड-अमेरिकेचा दौरा पार पडला. विवेकानंदांच्या प्रवास, निवास, प्रवचन सामर्थ्याने पवित्र झालेल्या स्थानांना भेटी दिल्या. हे त्यांच्या परदेशात वास्तव्य करणाऱ्या पुतण्यांच्या कृतज्ञताभावाने सिद्ध झाले. फार प्रचंड ध्यासातून व परिश्रमपूर्वक निष्ठेतून हे घडले. डॉ. करंदीकरांची ध्येयनिष्ठा असाधारण आहे हे वारंवार मान्य करावयास पाहिजे. परदेशी प्रवासावर त्यांनी ग्रंथ लिहिला तसेच ग्रंथपरीक्षणावरही लिहिला. याप्रकारे ते आपले व्यक्तिमत्त्व चौफेर व समृद्ध करीत होते.

लोकमान्य टिळकांनी स्थापन केलेल्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे ते आजीव सभासद झाले. त्या अगोदर बी.ए., एम्.ए.,च्या परीक्षात प्रथम दर्जाचे यश व मराठी विषयातली पारितोषिके मिळविली. फर्गसन महाविद्यालयासारख्या ख्यातनाम महाविद्यालयात मराठी विभागाचे विभागप्रमुख झाले, पुणे विद्यापीठात ज्ञानदेव अध्यासनाचे प्रमुख झाले, डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे सेक्रेटरी झाले आणि या पदावरून उल्लेखनीय काम केले. त्यात त्यांची सत्यप्रियता व कनिष्ठ कर्मचाऱ्याबद्दलची आस्था दिसून आली. या सर्व निष्ठांचा व्यासंगाचा, कर्तव्यदक्षतेचा वृतान्त या आत्मवृत्तात सविस्तरपद्धतीने आलेला आहे.

या आत्मवृत्ताला जीवनसंवाद असे जे नाव दिले आहे ते तितकेसे सयुक्तिक वाटत नाही. हा जीवनवृत्तांत आहे, संवाद नव्हे. ज्ञानेश्वरांचा आत्मसंवाद ज्या पातळीवरचा आहे त्या पातळीवर हा पोहचतो असे म्हणता येत नाही. डॉ. करंदीकर ज्ञानेश्वरीचे अभ्यासक आणि उपासक असले तरी ज्ञानेश्वरी जगणारे साधक नव्हेत. अध्यात्माचा तात्त्विक व्यासंग करणारी माणसे अध्यात्म जगतात की नाही याची शंका वाटते. स्वार्थ व परमार्थ याची सांगड घालत आयुष्याचे साफल्य साधणाऱ्या व्यक्तींची मोठी परंपरा हिंदू समाजात आहे, त्यांच्यात तर-तम-भाव असतो. त्याचा निर्णय आपल्या आकलनाच्या मर्यादेत घ्यावा लागतो. असा सावध विचारपूर्वक निर्णय घेणे आवश्यक ठरावे असा डॉ. वि.रा. करंदीकरांचा हा जीवनवृत्तांत आहे. यात अधिकर वृत्तांतच आहे.

या वृत्तांताच्या प्रारंभी निवेदित झालेली कुटुंबाची कहाणी भावस्पर्शी आणि विचारांना चालना देणारी आहे. प्रारंभीच्या भागात ही कहाणी बऱ्याच विस्ताराने आणि वर्ष, तारीख, वय यांच्या तपशीलात सांगितलेली आहे. हे सगळे तपशील काळजीपूर्वक लिहिलेल्या दैनंदिनीवर आधारलेले आहेत असे त्यांनीच नमूद केले आहे. ही दैनंदिनी त्यांनी १९३९ ते आजपर्यंत म्हणजे मधली चौदा वर्षे सोडली तर सतत पन्नास वर्षे लिहिली आहे. प्रत्येक दिवशी महत्त्वाच्या घटनांची तपशीलवार नोंद त्यांनी केली आहे. त्यामुळे कोठेही सत्याचा अपलाप झालेला नाही असे त्यांनी म्हटले आहे. आता सत्य हे व्यक्तिसापेक्षही असू शकते. ते अंतिम सत्य आहे असा दावा क्वचितच मान्य होतो. प्रा. मे.पुं. रेगे यांनी डॉ. करंदीकरांच्या नैतिक नेकीचा, त्यासाठी दाखविलेल्या धैर्याचा, पारंपरिक मूल्यांना धरून असलेल्या त्यांच्या सुशीलपणाचा आवर्जून निर्देश केलेला आहे. त्याचप्रमाणे सौ. शांताबाई करंदीकर यांनी सांभाळलेल्या भारतीय स्त्री-धर्माचा गौरवाने उल्लेख केलेला आहे. प्रारंभी दिलेल्या प्रवासी या कवितेत डॉ. करंदीकरांनी आपला निर्देश ब्रह्मांड धुंडणारा प्रवासी असा केलेला आहे. प्रभूची अनंत काळची कृती पहात मी कधीचा हिंडतो आहे असे म्हटले आहे.

पहिल्या प्रकरणात कौटुंबिक लागेबांधे अचूक सादर केले आहेत. त्यातून त्या काळाचे आणि डॉ. करंदीकरांच्या कौटुंबिक परिवाराचे नेमके दर्शन घडते. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या काही वैशिष्ट्यांचा उगम कोठे झाला हे ही ध्यानात येते. ते कोल्हापुरात जन्मले. वडिलांचे नांव रामचंद्र दत्तात्रय करंदीकर, आईचे सीता. आईचे वडिल दत्तात्रय गणेश चिपळूणकर, त्यांना घरात आबा म्हणत. त्यांचे धाकटे बंधू केशव उर्फ भाऊ. या दोघांनी बांधलेले घर शाहूपुरीत तिसऱ्या गल्लीत होते, दुमजली होते. या दोघांच्या स्वभावात मोठाच फरक होता. आबा अतिशय कर्मठ तर भाऊ आधुनिक विचाराचे. दोघेही दीर्घायुषी झाले. (दीर्घायुष्य डॉ. करंदीकरांना पुरूषार्थाचे एक गमक वाटते.) आबांचा कारकून म्हणून पगार पंधरा रूपयांच्यावर कधी गेला नाही. घरात पत्नी, सात मुले. घरात



अनुक्रमणिका

आबांनी एक भाडेकरू ठेवला होता. त्याचे तीन-चार रुपये भाडे येत असे. बेडगेच्या जहागीरदाराकडे कारकुनीचे काम ते करीत असत. भाऊ हरहुन्नरी होते. विमा कंपनीचे प्रतिनिधी म्हणूनही ते काम करीत. 'शौचास साफ' या नावाचे एक चूर्ण त्यांनी तयार केले होते. आबा कर्मठ असले तरी कुटुंबातील एका विधवेने सोवळे न होणे हे ते स्वीकारू शकत होते. या प्रकारचा व्यवहारी समन्वय साधण्याची वृत्ती त्यांच्याकडून डॉ. करंदीकरांकडे उत्तरवयात उतरली असण्याची शक्यता आहे. त्यांचे आजोबा शाहू महाराजांच्या सेवेत होते. ते बुद्धिमान कारकून होते. शाहू महाराजांच्याबद्दल त्यांना अतीव आदर होता. ते असते तर नातवाच्या शिक्षणाची सोय त्यांनी केली असती असे ते म्हणत. त्यांना संस्थानाकडून अठरा रुपये सहा आणे पेन्शन मिळे. प्राचीन ऋषींच्या नावाबरोबर ते लोकमान्य टिळकांच्या नावे अर्घ्य देत. संस्कृत स्तोत्रे नातवाकडून नदीवरच्या स्नानाच्यावेळी म्हणून घेत. दर मंगळवारी येणारा केसरी वाचून घेत.

त्या अगोदर डॉ. करंदीकरांनी बालपणी आपल्यावर झालेल्या संस्काराचे, आपल्या आईच्या सोशीकपणाचे, वडिलांच्या निष्क्रियतेचे इतके तपशीलात जाऊन वर्णन केले आहे की, त्याचा संक्षेप करणे सोपे नाही. त्यांचे व्यक्तिमत्व कसे घडले त्यासंबंधी त्यांनी नमूद केलेल्या काही गोष्टींची नोंद घेणे आवश्यक आहे. 'आई अठरा वर्षांची होण्याच्या अगोदरच माझा जन्म झाला. जन्म झाला तेव्हा माझा कान फुटलेला. विहिरीत खूप उंचीवरून उडी घेणे आणि एकीकडून बुडी घेऊन लांब अंतरावर दुसरीकडे बाहेर पडणे हे माझे आवडते छंद' (त्यामुळे ऐकू येणे कमी झाले) तात्यांना (वडिलांना) साग्रसंगीत जेवण लागे. मी मोठा झाल्यावर ते मला म्हणाले, 'भिक्षुकीचा धंदा सर्वात छान. काही ना काही कारणानं लोकांकडं जेवायला जायला मिळतं' 'का कुणास ठाऊक पण भिक्षुक म्हणून कुणाकडे जेवायला जायचा मला तिटकारा होता. वडील मारकुटे होते. एकदा त्यांनी मला झोडपून काढले. चौथीत मी वर्गात पहिला आलो. बॉय स्काऊटचा उपक्रम मला रूबाबदार वाटत असे. स्वच्छ जेवायला व ताट स्वच्छ करायला शिकविले.' डॉ. करंदीकरांनी ही स्वच्छतेची आवड आयुष्यभर जपली आहे. सर्व क्षेत्रात आपल्या कल्पनेप्रमाणे स्वच्छता पाहिजे, असा त्यांचा तात्त्विक अट्टाहास असतो. दैनंदिन व्यवहारात नीटसपणाचा त्यांचा आग्रह असतो. लहानपणी ते फार धडपडे होते. कोठेतरी उंच ठिकाणी जाणे ही त्यांची स्वाभाविक आवड होती. आयुष्यभर उंच ठिकाणी जाण्याचा त्यांनी यशस्वी प्रयत्न केला. लहानपणी कुणीतरी त्यांना म्हटले होते. 'केवढासा आहेस तूं अगदी छोटा' तेव्हा त्यांनी फटकन उत्तर दिले, 'मी एवढासा असेन पण असं काहीतरी करून दाखवीन की, तू चकित होऊन जाशील' ते त्यांनी खरे करून दाखविले. जिद्द, अखंड परिश्रम, तडफदार बुद्धिमत्ता या गुणांच्या जोरावर त्यांनी प्रत्येक क्षेत्रात सतत यशाची शिखरे पादाक्रांत केली, ती विद्येच्या क्षेत्रात, शिक्षणाच्या क्षेत्रात, सोसायटीच्या पदाधिकाऱ्यांच्या भूमिकेत, राष्ट्रभक्तीच्या क्षेत्रात अगर वैवाहिक सहजीवनाच्या क्षेत्रात अगर कृतज्ञ गृहस्थाश्रमाच्या क्षेत्रात मित्र, बंधुभावाच्या संबंधात या सर्व ठिकाणी त्यांनी कर्तव्यभावनेच्या व कृतज्ञतेच्यापोटी औदार्याने वर्तन केले. ही त्यांच्या आयुष्यातली स्पृहणीय, उदात्त जमेची बाजू आहे. ती त्यांनी सांपत्तिक पातळीनुसार व्यवहाराच्या मर्यादेत सांभाळली. असे करण्यात न्यूनतेचा भाग येतो असे नाही. अत्यंत उदारमनस्क संसारी माणसाला व्यवहाराच्या मर्यादेतच वावरावे लागते. काही प्रसंगात औदार्य व व्यवहार यांचा हिशेब ठेवावा लागतो हा दोष गणला जाऊ नये.

आपल्या लौकिक आयुष्याची वाटचाल त्यांनी काटेकोर तपशीलांनी निवेदन केलेली आहे. तिचा साद्यंत आढावा घेण्याची गरज नाही. काही गोष्टी नमूद करता येतील. त्यांना व्यायामाची आवड होती. भरपूर पाण्याने स्नान करण्याचा त्यांचा परिपाठ होता. अंबाबाई तालमीत मिरजेत त्यांचे व्यायामपटू मित्र होते. हुतूतू, सिंगलबार यात ते निष्णात होते. श्री. पुंडलीकजी कातगडे हे देशभक्त त्यांच्या परिचयाचे होते. शाळेत असताना, अभ्यासात, निबंध लेखनात, स्पर्धात त्यांनी पारितोषिके मिळविली होती. तो काळ राजकीय जागृतीचा होता. त्यांच्या जाणीवांचा नाना दिशांनी विकास घडण्यास त्याचा उपयोग झाला. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे गाढ संस्कार त्यांच्या मनावर झाले. लहान असतानाच सात भावंडांची जबाबदारी आपल्यावर आहे हे त्यांना सांगण्यात आले. त्यांचे पालनपोषण ही आपली जबाबदारी आहे असे त्यांच्या वडिलांनी, तात्यांनी, कधीच मानले नाही. तात्यांच्या या बेजबाबदार वर्तनासंबंधी डॉ. करंदीकरांनी धारदार कडवटपणाने लिहिले. ते सार्थ असले तरी वाचकांना अस्वस्थ करणारे आहे. आईच्या, ताईच्या सहनशीलतेपुढे ते सदैव नतमस्तक होत. मिरजेच्या राजघराण्यासंबंधी त्यांना आदर

होता. चारित्र्याची जोड असेल तर उद्योगप्रियता व श्रीमंती ही त्यांना पुरूषार्थाची, विशेष निशाणी वाटत आली आहे.

एकोणीसशे पस्तीस साली मॅट्रिकची परिक्षा झाल्यानंतर अचानक त्यांच्या आयुष्याला निर्णयात्मक वळण देणारा एक वैचारिक, धार्मिक व अध्यात्मिक खजिना अचानकपणे त्यांच्या हाती आला. तो म्हणजे विवेकानंदांचे समग्र ग्रंथ. आयुष्यभर पुरून उरणारा प्रभाव त्यांच्यावर ओसंडला. रामकृष्ण, विवेकानंद एका बाजूला व संघ परंपरा व सरसंघचालक दुसऱ्या बाजूला यांनी त्यांचे मनोविश्व व्यापून टाकले. राष्ट्रवृत्तीचे एक म्हटले तर अध्यात्म होते आणि संन्यास, समाधी, साक्षात्कार या मार्गावरचे दुसरे अध्यात्म होते. या दोन्हींचा मेळ घालण्याचा ते सतत प्रयत्न करीत राहिले आहेत. व्यवहारदक्ष संसारी माणसाचा गृहस्थ धर्म या केंद्रात या दोन्ही मार्गाचा समन्वय होत राहीला. वयाच्या सोळाव्या वर्षी त्यांनी केलेली प्रतिज्ञा अशी – "मी प्रति-विवेकानंद होणे हे माझे ध्येय ठरविले आहे" या कामाचा एक तक्ताही त्यांनी निश्चित केला.

"वय वर्षे १६ ते २५ – धर्म व तत्त्वज्ञान यांचा अभ्यास. वय वर्षे २५ ते ३० – समाजव्यवस्थेचा अभ्यास. आणि वय वर्षे ३० पासून पुढे आपली मते दृढ ठरवून त्यांवर व्याख्याने देणे"

"विवेकानंदांप्रमाणे साक्षात्कार व्हावा अशी माझी तीव्र इच्छा आहे". ती फलद्रूप झाल्याचा निर्देश येत नाही. काही उल्लेख येतात ती अर्थपूर्ण आहेत. श्री रामकृष्णांचे अनुकरण आपण करू शकत नाही हे कळाल्यावर मन विवेकानंदांकडे वळले कारण ते कार्यकर्ते होते, पाश्चात्य जगाशी त्यांचा संपर्क आलेला होता आणि ते समाजाभिमुख होते. उत्तम वक्ते होते, व्यासपीठावर प्रभावी होते. इंग्रजी भाषेवर प्रभुत्व असणारे होते. रामकृष्णांचा मार्ग शुद्ध तापसी अध्यात्मवादी होता. कालिमातेवर त्यांची अंतिम श्रद्धा होती. संसारसुखापासून ते निर्धाराने विरक्त राहू शकले होते. त्यांना उन्मनी अवस्था प्राप्त झालेली होती. विवेकानंदांच्या शिकवणीत भारतीयांच्या भौतिक उन्नतीचा, देशप्रेमाचा, शिस्तबद्ध कार्याचा, धर्मगौरवाचा जो भाग होता, त्याप्रमाणे आपण जनजागृती करावी असे डॉ. करंदीकरांनी ठरविले. त्याचवेळी त्यांचे संबंध राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या स्थानिक आणि उच्चपदस्थ नेत्यांशी येत गेले. संघाच्या सर्व प्रकारच्या कामात त्यांनी स्वतःला झोकून दिले. संघाचे काम विवेकानंदांच्या विचाराशी जुळणारे आहे असे त्यांना वाटले, त्याचे स्पष्टीकरण आलेले नाही. स्वातंत्र्यवीर सावरकरांशी त्यांची गाठ पडली. त्यांच्या व्यक्तिमत्वाने, वक्तृत्वाने आणि जाज्वल्य देशभक्तीच्या प्रेरणांनी ते भारावून गेले. या काळात संघकार्यात ते आकंठ बुडून गेले होते. त्याचप्रमाणे आपल्या प्राचीन धर्म, संस्कृती व तत्त्वज्ञान यांचा अभ्यास करण्याचा जो निर्णय त्यांनी घेतला होता त्याचाही पाठपुरावा ते करीत होते. गीता, उपनिषदे, ज्ञानेश्वरी, दासबोध, तत्त्वज्ञान विषयक ग्रंथ यांचे सखोल आलोडन त्यांनी केले व त्यापैकी वामन पंडितांच्या यथार्थदीपिकेचा प्रबंध लेखनासाठी परिपूर्ण अभ्यास केला. या कामात त्यांनी आपल्या सर्व शक्ती पणाला लावल्या. त्यांचा हा निर्धार व नैष्ठिक बळ असाधारण होते. काही कीर्तनकार, सत्पुरूष, संन्याशी, मसुराश्रमात झालेले वास्तव्य याचेही योगदान या जडणघडणीत होते. मसुराश्रमातल्या वास्तव्यात त्यांना महाराजांच्या सुप्त चारित्र्याचे पहिले धक्कादायक दर्शन घडले पण त्यावर फारसे विचारमंथन त्यांनी केलेले आढळत नाही. उलट स्त्री-पुरूष संबंध हाच चारित्र्याचा गाभा आहे अशी त्यांची धारणा बनली. त्यांना आदरणीय वाटणाऱ्या नेपोलियनसारख्या वीरपुरूषांचा या संदर्भात विचार करण्याची गरज त्यांना दिसली नाही. जगविख्यात कलावंत, वीरपुरूष, देशभक्त यांचे अन्य क्षेत्रातले काम ध्यानात घेतले तर अभ्यासकांनी या चारित्र्यदोषांना फार महत्त्व दिलेले आढळत नाही. या संबंधांचे दंडक, आक्षेप आणि निर्बंध हे कालपरत्वे, समाजपद्धतीप्रमाणे बदलत जातात. असेच इतिहास दाखवितो. याकामी पुराणातले दाखले उपयोगी पडत नाहीत. याचा अर्थ काही दंडकच नकोत असा होत नाही पण ते सरळसोट दंडक असणे शक्य नसते. याचा अत्याग्रह दुराग्रहच ठरतो. शिवाय स्त्री-पुरूष संबंध हे चारित्र्याचे एकमेव परिमाण नाही, स्वार्थ, भ्रष्टाचार, गैरमार्गाने मिळवलेला पैसा, सत्तेचा गैरवापर, समाजातील अधोलोकात राहणाऱ्या बांधवावरचे अत्याचार पिळवणूक याकडे शतकानुशतके दुर्लक्ष करणे हीदेखील चारित्र्यहीनतेची परिमाणे असू शकतात. सारांशाने चारित्र्यहीनतेचे निकष वर्गीय चौकटीत मर्यादित करणे योग्य ठरत नाही. आपल्यासारख्या बहुस्तरीय व बहुवर्गीय आर्थिक विषमतेचा शाप असणाऱ्या समाजात चारित्र्याचा ठेका एका वर्गाच्या चालीरीतींना आणि परंपरेला देणे योग्य नव्हे.

आपल्या समाजव्यवस्थेचा अभ्यास करण्याचाही कार्यक्रम डॉ. करंदीकरांनी निश्चित केला होता. त्याप्रमाणे उच्च ब्राह्मणवर्गाच्या विरूद्ध टोकाला असणाऱ्या अस्पृश्यांची ओळख






करून घेण्याचे त्यांनी ठरविले. परंपरागत चातुर्वर्ण्य व्यवस्थेतील अंतर व दुरावा दूर करण्याचा (परंपरागत सांस्कृतिक व आर्थिक चौकट शाबूत ठेऊन) हिंदूधर्मांतर्गत सामंजस्य निर्माण करण्याचा प्रयत्न अनेक सुधारणासन्मुख कार्यकर्त्यांनी केला. या संदर्भात आर.एस.एस. मध्ये मतभेदही झाले. त्यातूनच श्री. मधु देवल, डॉ. करंदीकरांचे मिरजेतले स्वयंसेवक संघातले सहकारी यांचे मतभेद झाले व त्यांनी म्हैसाळ येथे हरिजन सोसायटीची स्थापना स्वतःची मालमत्ता उपयोगात आणून दिली. त्यासंबंधी कोणतेही चिंतन डॉ. करंदीकर करीत नाहीत. हरिजनांना प्राचीन हिंदू जातीयव्यवस्थेत शाबूत ठेवणेच त्यांना योग्य वाटते. अन्यायकारक सामाजिक चौकटीचा मूलभूत विचार केला पाहिजे असे त्यांना वाटत नसावे. ही सर्व हिंदू समाज-व्यवस्थेचीच धारणा आहे. आज त्याला अनेक समर्थ आव्हाने निर्माण झालेली आहेत. ती हिंसाचाराने निपटून काढणे हेच या व्यवस्थेला इष्ट वाटते. आपली चौकट बदलावी असा विचार त्यांच्या मनात येत नाही. फॅसिस्ट व मार्क्सिस्ट मनोवृत्तीची ही दोन टोके भारतीय समाजाच्या संदर्भात अधिकच गुंतागुंतीची होतात.

एकोणीसशेचाळीस साली डॉ. करंदीकर मिरजेस परत आले. डॉ. हेडगेवारांचे देहावसान झाले. संघावर तो मोठा आघात होता. त्यांच्या पश्चात श्री. गोळवलकर गुरूजी सरसंघचालक झाले. डॉ. करंदीकरांनी अलिकडे तीन सरसंघचालक व राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा इतिहास असे दोन बृहत ग्रंथ सिद्ध करून आपल्यावरचे संघपरिवाराचे ऋण फेडण्याचा यत्न केला आहे. त्यानंतरच्या काळात जे प्रवास व ज्या घडामोडी झाल्या त्यांची नोंद महत्त्वाची नाही. एक महत्त्वाची नोंद अशी : "एकाद्या उदात्त गोष्टीसाठी प्रयत्न करावा, पण मनावर कोणतीही गोष्ट एका मर्यादेबाहेर लादू नये, हे कळण्याइतकी समज मला आली होती," ही त्यांची समज उत्तरोत्तर दृढ होत गेली याचे भान ठेवणे गरजेचे आहे. आपली समजूत भाबडी असल्याचाही निर्देश त्यांनी केला आहे. नंतरच्या टप्प्याचे शीर्षक 'संघ प्रचारक व महाविद्यालय' असे आहे. त्या अगोदर मिरजेस आजारपणाच्या निमित्ताने विश्वनाथ रानडे या मित्राच्या घरी रहावे लागले. या काळात जेवणाला मुकावे लागण्याचे प्रसंग अनेकवेळा आले. तरी या काळात अनन्य निष्ठेने त्यांनी संघगीत रचले होते,

*"सोडी तरी न धरले व्रत जे ज्वलंत।*
*तू संघ संघ मंत्र मम अंतरात।।"*

हे त्यांचे गीत संघ परिवारात प्रिय झाले. संघाच्या कामाचे विस्तृत, तपशीलवार वर्णन पुढच्या भागात येते. ते परिपूर्ण उतरले आहे. या काळात जहाल विचारांचे तरूण सशस्त्र क्रांतीचा विचार करीत होते. त्यासाठी साहसी काम अंगावर घेत होते. डॉ. करंदीकर याला अपवाद नव्हते. यानंतर निष्कांचन अवस्थेत प्रेमविवाह करण्याचे मोठे धाडस त्यांनी केले. त्यांचा मित्र विश्वनाथ रानडे याची बहीण दुर्गा हिच्याशी प्रेमविवाह करण्याचे रोमांचकारी साहस त्यांनी केले. दुर्गा या राष्ट्रसेविका समितीच्या प्रमुख कार्यकर्त्या डॉ. करंदीकरांच्या ध्येयनिष्ठेशी एकरूप होऊ शकणाऱ्या. म्हणून घरातील वडिलधाऱ्या माणसांच्या संमतीशिवाय गुप्तपणे घराबाहेर पडण्याचे धाडस त्या करू शकल्या. उभे आयुष्य त्यांनी ध्येयनिष्ठेने डॉ. करंदीकरांशी एकरूप होऊन व्यतीत केले. या घटनेचे रोमहर्षक वर्णन डॉ. करंदीकरांनी केले आहे. प्रसंगाशी तद्रूप होऊन लिहिले आहे. काहीसे विस्तृत झाले आहे.

एकोणीसशे बेचाळीसच्या राजकीय घडामोडीवर त्यांनी केलेले भाष्य त्यांच्या निष्ठेशी आणि विचारसरणीशी प्रामाणिक आहे. 'हिंसाचाराचे थैमान चालले असताना जे शांतीसूक्ताचे पाठ गातात, त्यांपैकी कोणी महात्मा ठरतो' याची किंमत समाजाला मोजावी लागते. हा दोन विचार आणि आचार-सरणीतला फरक आहे आणि तो न मिटणारा आहे इतकेच समजून घ्यायचे. हिंसाचाराचे थैमान आजही चालू आहे आणि त्याचे समर्थनही केले जात आहे.

यानंतरच्या भागात संघाच्या कार्याची व डॉ. करंदीकरांच्या व अन्य कार्यकर्त्यांच्या सहभागाची संबंधित घडामोडींची आणि निरनिराळ्या भागात चाललेल्या कार्याची संगतवार व विस्तार-पूर्वक हकीकत आलेली आहे, ती डॉ. करंदीकरांच्या ध्येयनिष्ठेची द्योतक आहे. गांधीहत्त्या व नथूराम यांची माहिती आलेली आहे. 'या हत्त्येमुळे संघकार्य किती मागे पडले' असेही विधान आहे.

पुढच्या पर्वात डॉ. करंदीकरांनी विलिंग्डन महाविद्यालयात उच्च शिक्षणाला कसा प्रारंभ केला. त्यासाठी हितचिंतकांनी व मित्रांनी त्यांना आर्थिक सहाय्य कसे केले याचे तपशीलवार रुपये – आणे – पै सह वर्णन आलेले आहे. ते त्यांच्या जन्मजात स्वभावाला, कृतज्ञबुद्धीला योग्य असेच आहे. ही संधी मिळाल्यानंतर त्यांनी त्या संधीचे सोने केले. बुद्धिमत्ता, इच्छाशक्तीला कठोर परिश्रमाची नव्हे, तपश्चर्येची जोड दिली व बी.ए., एम्.ए. या परीक्षात प्रथमश्रेणीचे अतुलनीय यश








संपादन केले त्याचे श्रेय त्यांना मोकळेपणाने जरूर दिले पाहिजे. त्याचप्रमाणे या प्रकारची आर्थिक सुविधा प्राप्त झाल्यानंतर त्यांनी आपल्या भावंडांच्या शिक्षणासाठी जे मार्गदर्शन व आर्थिक सहाय्य उपलब्ध करून दिले तो त्यांच्या कुटुंबीय कर्तव्याचे फार मोठे योगदान होते हे देखील मोकळेपणाने मान्य केले पाहिजे. आपल्या सर्व भावांचे शिक्षण त्यांनी योजनापूर्वक पार पाडले. त्यांना आयुष्यात, संसारात स्थिर केले. त्यांची कमजोरी, आजारपण, कुवत, व्यवसाय यांचे विचारपूर्वक नियोजन केले. इतके झाल्यावर त्यांच्या आयुष्याचा भार अतिरिक्तपणे स्वीकारला नाही. सर्व मोठ्या कुटुंबाच्या निर्वाह, भवितव्याची धुरा त्यांनी समर्थपणे वाहिली. हा त्यांच्या कार्यक्षमतेचा व कर्तव्यबुद्धीचा फार मोठा भाग म्हटला पाहिजे. माझ्या इंग्रजी विषयातल्या यशाबद्दल व माझ्याशी झालेल्या मैत्रीबद्दल त्यांनी गौरवाने लिहिले आहे तसेच माझ्या धूम्रपानाच्या सवयीबद्दल नाराजी व्यक्त केली आहे ती योग्यच आहे. निरोगी जीवनाचे धडे मला कधीच गिरवता आले नाहीत. त्याचे परिणाम मी सहन करतो आहेच. असे असूनही पुढच्या काळात सहकारी मित्र म्हणून आम्ही एकत्र दिवस काढले. पुण्यात त्यांच्या घरी आम्ही (मी व माझी पत्नी) अनेकवेळा वास्तव्य केले. त्यांनी आमचे आदरातिथ्य केले याबद्दल मी त्यांचा अतिशय कृतज्ञ आहे. ते स्वयंसेवक संघाचे अनुयायी असले तरी अन्य विचारसरणीच्या नामवंत बुद्धिमंतांशी, आचार्य भागवत, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्रा. अ.भि. शहा, प्राचार्य मे.पुं. रेगे, प्रभाकर पाध्ये यांचे त्यांच्याशी सलोख्याचे, मैत्रीचे संबंध होते. त्यांचे अतिथ्य करण्यात त्यांना मनापासून धन्यता वाटे हे त्यांच्या वैचारिक व गृहस्थाश्रमी औदार्याचे मोठेच लक्षण मानले पाहिजे.

डॉ. करंदीकर डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्य झाले. विलिंग्डन व फर्गसन महाविद्यालय, पुणे विद्यापीठ यां उच्च शिक्षणकेंद्रात मानाचे स्थान त्यांना मिळाले. विश्वकोश निर्मिती मंडळाच्यावतीने शब्दकोशाचे काम त्यांनी केले. विद्वत्तेच्या क्षेत्रात मोठी मान्यता व आदरभाव संपादन केला. श्री रामकृष्ण-विवेकानंदांचे चरित्र सिद्ध केले. परदेशी प्रवास केला विवेकानंदांच्या पावलांचा आणि वाणीचा मागोवा घेत ते देशात परदेशात फिरले. पाश्चात्य संस्कृतीचे निरीक्षण केले. असे उज्ज्वल यशस्वी आयुष्य त्यांनी व्यतीत केले याचा सार्थ अभिमान त्यांना असावा यात गैर काहीच नाही. सोसायटीत अनेक महत्त्वाच्या पदावर महत्त्वाची काम त्यांनी निष्ठेने, कसोशीने केली. फर्गसनचे प्राचार्यपद व अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांना लाभले नाही. पुणे विद्यापीठाच्या ज्ञानदेव अध्यासनाच्या प्रमुखपदी त्यांची नियुक्ती झाली. त्यासंबंधी काही मतभेद, गैरसमज झाले: मोठ्या पदाबद्दल ते टाळणे शक्य होत नाही. सोसायटीचे काम करताना त्यांनी फार मोठी जबाबदारीची जाणीव दाखविली. संयुक्त सभेच्या कामकाजात ते तत्पर, दक्ष आणि कमालीचे कार्यक्षम राहिले. ते सोसायटीचे सेक्रेटरी झाल्यानंतर त्यांनी या संदर्भातल्या सर्व प्रकरणात कामकाजात कोणावर अन्याय होणार नाही, कुठे गैरप्रकार घडणार नाहीत, ज्या काही तक्रारी असतील त्याबद्दलची संपूर्ण माहिती घेऊन, ती संयुक्त सभेत मांडून त्यावर योग्य तो न्याय मिळेल यासाठी त्यांनी जिवापाड मेहनत घेतली. प्रत्येक प्रकरणाची कागदपत्रे स्वतंत्र फायलीमध्ये जपून ठेवली. संबंधित व्यक्तींचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले, त्यांचे लेखी निवेदन घेतले. ही माहिती अन्य ठिकाणाहून तपासून घेतली. त्याची नोंद ठेवली आणि प्रकरण सभेमध्ये साद्यंत मांडून त्याचा योग्य तो निर्णय लागवा म्हणून प्रयत्नांची पराकाष्ठा केली. प्रत्येक प्रकरणाच्या फायली आजही त्यांनी जतन करून ठेवल्या आहेत. या प्रकरणांच्या हकिकती त्यांनी आत्मचरित्रात विस्ताराने मांडलेल्या आहेत. आज संबंधित व्यक्तींपैकी बरेच जण हयात नाहीत. काहीजण विस्मृतीत गेलेले आहेत. त्यामुळे या गोष्टी इतक्या तपशीलात मांडून आज वाचकांना त्यात रस वाटेल असे नाही. डॉ. करंदीकर किती निःपक्षपातीपणाने आणि न्यायप्रियतेने वागत आले आहेत अशी प्रतिमा मात्र तयार होते. कित्येकांना ती समर्थनाच्या स्वरूपाची वाटण्याची शक्यता नाकारता येत नाही. एका यशस्वी विद्या-व्यासंगी सत्यनिष्ठ, न्यायप्रिय जीवनाची ही तन्मयतेने निवेदन केलेली कहाणी आहे. ती उद्बोधक वाटेल यात शंका नाही.

अखेरीस काही अपेक्षा उरतात. इतका दूरवरचा ध्येय-पथावरचा प्रवास केल्यानंतर आणि प्राचीन धर्मग्रंथ, परंपरा, सत्पुरूष सहवास आणि अध्यात्ममार्गावरील जगद्वंद्य यांच्या विचारांचे खोलवरचे चिंतन केल्यानंतर आपल्याला या अध्यात्मपर मार्गावरचे डॉ. करंदीकरांचे काही मौलिक व्यक्तिगत चिंतन वाचायला मिळेल अशी अपेक्षा होती. ती मात्र पूर्ण होत नाही. काव्यरचना उद्धृत करण्याऐवजी हे दीर्घ चिंतन त्यांनी सादर केले असते तर ग्रंथ सर्वांगांनी परिपूर्ण झाला असता.

**






वाद-संवाद

# 'देवकथा आणि भारतविद्या' विषयी

**विश्वनाथ खैरे**

वाद-संवाद (*नवभारत*, ऑगस्ट २००४) सदरात, 'देवकथा आणि भारतविद्या' (ले. विश्वनाथ खैरे) या टिपणावरील चर्चा (ले. वसंत पळशीकर) आली आहे.

या चर्चेत पळशीकरांनी स्वतःकडे अकारण ऊनत्व घेतले आहे. हे मूळ *टिपण* समोर नसल्यास चर्चेच्या वाचकांचा (गैर) समज होऊ शकेल की, टिपणात पळशीकरांच्या एकूणच *लेखावर* किंवा प्रतिपादनावर मी 'घोटाळे, विपर्यास, अडाणीपणा' अशा कडक शब्दांची आठवण होण्यासारखी टीका केली आहे. तसा काही प्रकार नाही. किंबहुना, या शब्दांची त्यांना आठवण व्हावी याचे मला दुःख वाटते. हे स्पष्ट करण्यासाठी चर्चेतल्या काही [(प) अंकित] विधानांचा व मुद्द्यांचा परामर्श [(ख) अंकित] विवेचनात पुढे घेतला आहे :

१. (प) "मान्य देवकथेला ज्या पुढच्या पिढ्या नव्या कल्पितांची जोड देतात त्यांत त्यांचा इतिहास दडलेला असतो अशी डॉ. ढेरे यांची जाण आहे. मला त्यांची जाण बरोबर आहे असे वाटते."

(ख) "मान्य देवकथेला नव्या कल्पितांची जोड पुढच्या पिढ्या देतात. त्यात 'इतिहास' अर्थातच नसतो." (- *टिपण*). याच्या पुढेमागे शंकराच्या देवकथेला जोडलेल्या कल्पितांची उदाहरणे दिली आहेत : डोंगराचे नाव धवळागिरी ठेवणे, गौळ्यांनी महाप्रासाद उभारला म्हणणे, डोंगराची पार कृतयुगापासूनची कल्पित नावे देणे.... इ. असल्या कल्पितांमध्ये इतिहास पाहता येणार नाही.

२. (प) 'श्री. खैरे यांनी 'अग्रणी चिकित्सक' असा माझा गौरवपर उल्लेख केला आहे. त्याला मी पात्र नाही, हे त्यांचे टिपणच स्पष्ट करते.'

(ख) भारतविद्याविषयक चिकित्सा करणारे थोडेच; त्यांमध्ये पळशीकर अग्रणी आहेतच. *टिपणात* त्यांच्या प्रतिपादनाची चिकित्सा केली किंवा दुसरी बाजू दाखवून दिली म्हणून त्यांचे चिकित्सकपण अमान्य केले असे होत नाही.

३. (प) "डॉ. ढेरे यांचा ग्रंथ भारतविद्येच्या कक्षेत मोडत नाही असे मला वाटते."

(ख) *टिपणाचे* पहिलेच वाक्य असे आहे : "भारतातली संस्कृती, समाजाचा इतिहास, लोकजीवन इत्यादींचा अभ्यास भारतविद्येत मोडतो." यानुसार डॉ. ढेरे यांचा ग्रंथ भारतविद्येतच मोडतो.

युरोपच्या दृष्टीने पूर्वेकडे असलेल्या, भारत धरून देशांविषयीच्या अभ्यासाला 'ओरिएंटल स्टडीज' असे इंग्रजी नाव आहे. त्याचा देशी पर्याय 'प्राच्यविद्या' असा प्रचारात आहे. प्राच्यविद्येचा भारताविषयीचा भाग म्हणजे भारतविद्या. 'प्राच्य' म्हणजे पूर्व. पण 'प्राच्य' चा एक अर्थ 'प्राचीन' असाही असल्याने भारतविद्या प्राचीन भारताच्या अभ्यासापुरती मर्यादित आहे असा समज होतो.

४. (प) "चातुर्वर्ण्याधिष्ठित ब्राह्मणी वर्चस्व महाराष्ट्राच्या या भागात पेशवाईच्या स्थापनेनंतर विशेष वाढले/प्रस्थापित झाले याचे हे (लोककथेत उईलाचा अंतर्भाव होणे) निदर्शक आहे असे म्हणावे का?"

(ख) महाभारतातल्या किरातार्जुनकथेतसुद्धा झाडाच्या मुळाशी असलेल्या कृश ब्राह्मणाचे पात्र आहे. तेथे ते इंद्राने घेतलेले रूप आहे. चिन्मयदासाचा उईल हालअपेष्टा सोसणारा पण शिंगणापूरच्या शिवाचा परमभक्त आहे. अशा भक्ताची धनवंत राजावर सरशी झालेली आहे. हा पारंपरिक भक्तिगौरवाचा भाग आहे. चातुर्वर्ण्याधिष्ठित ब्राह्मणी वर्चस्व प्राचीन काळापासूनच चालत आहे. पेशवाईत ब्राह्मणांना राजकीय वर्चस्व मिळाले. तरी खुद्द पेशव्यांनासुद्धा सामाजिक-धार्मिक क्षेत्रात त्याचा फायदा मिळाला नाही. बाजीरावाला समशेरबहादुराची मुंज करता आली नाही किंवा नानासाहेबांना नाशिकच्या घाटावर येण्याला विरोध झाला.

असा एकंदर विचार केला तर देवकथेत एका ब्राह्मणाचा अंतर्भाव करणाऱ्या कल्पिताचा ब्राह्मणांच्या राजकीय वर्चस्वाच्या वाढीशी संबंध जोडता येणार नाही.

५. (प) "माझ्या लेखातली 'विधाने घोटाळ्याची आहेत', 'सारे प्रतिपादन विसंगत आहे' या आशयाच्या श्री. खैरे यांच्या

टीकेतला तथ्यांश मी स्वीकारतो. या विषयात त्यांचा व्यासंग व अधिकार मोठा आहे."

(ख) पळशीकरांच्या सबंध *लेखाला किंवा प्रतिपादनाला उद्देशून असे टीकात्मक विधान टिपणात कोठेही आलेले नाही.* 'घोटाळ्याचे आणि 'प्रतिपादन विसंगत' हे शब्दप्रयोग ज्या ठिकाणी आले आहेत ते असे :

"पुढचे विधान : "जर भोसले आणि इतर मातब्बर मराठी कुळे ही 'दक्षिणेकडून आलेली असली' तर ती 'चंद्रवंशीय असणार', त्यांची भाषा संस्कृतही नसणार, वा ती इंडो-आर्यन कुळातलीही नसणार' - *हे घोटाळ्याचे आहेच,* पण ज्या तेराव्या शतकोत्तर काळाचा विचार त्यात आहे त्या काळाशी त्याचा काही संबंधही खरोखर नाही. एकूण दक्षिणदेशाचा भाषिक-सांस्कृतिक-राजकीय संबंध विंध्याचलापलीकडील लोकांशी 'किमान सिंधू संस्कृतीच्या काळापासून असावा असे *लेखात* पृ. १२ वर म्हटले आहे. *त्याच्याशीही हे प्रतिपादन विसंगत आहे.'*

कोणत्याही 'टिकेतला तथ्यांश' त्यासाठी दिलेल्या पुराव्यांच्या आणि वस्तुनिष्ठतेच्या आधारावर स्वीकारला जावा, टीका करणाराचा 'व्यासंग व अधिकार मोठा' म्हणून नको. तसेच, प्रचलित भारतविद्येतली मते व्यासंगी आणि अधिकारी व्यक्तींनी मांडली आहेत म्हणून त्यांची चिकित्सा किंवा त्यांच्यावरची वस्तुनिष्ठ टिका स्वीकारली जात नाही असे होऊ नये.

६. (प) "प्रा. रायचौधरी व प्रा. भुसारी यांचे लेखन वाचल्यावर मला जे आकळले त्या आधारे मी लिहिले. त्यांचे म्हणणे मी विपर्यस्त करून मांडले आहे असे मला वाटत नाही."

(ख) *असा आरोप टिपणात केलेला नाही. टिपणा*तली या संदर्भातली दोन विधाने अशी आहेत :

"रायचौधरींच्या अवतरणात जनपदाचा जो विस्तार वर्णिला आहे तो ऐतरेयकाळातल्या जनपदांना लागू पडण्याजोगा नाही."

"भुसारींच्या ग्रंथात जनपदे म्हणजे 'प्रदेशविभाग' असे स्पष्टपणे म्हटले आहे. त्यामुळे तेराव्या शतकात नोंद झालेल्या देवकथेवरून पार प्राचीन काळात झेप घेण्याची *लेखा*तली सूचना समर्थनीय नाही."

७. (प) "जनपद म्हणजे ग्रामविशेष' हा सायणभाष्यात दिलेला अर्थ पर्याप्त नाही असे म्हणण्याचे मी धाष्ट्र्य (अडाणीपणापोटी?) करतो." (छापलेल्या मजकुरात?. या विरामचिन्हांची अदलाबदल झालेली दिसते.)

(ख) यासंबंधी *टिपणा*त असे म्हटले आहे की, "हा अर्थ वेदब्राह्मणकालीन राज्यांच्या किंवा जनपदांच्या आकाराला अनुरूप आहे." तो 'पर्याप्त नाही' असे पळशीकरांना वाटले तर तो 'अडाणीपणा' म्हणण्याचे काहीच कारण नाही.

**













अनुक्रमणिका

आगामी प्रकाशन

वैदिक संस्कृत, भाषाशास्त्र, महाभारत-रामायण-भगवद्गीता, संस्कृत वाङ्मय यांचे गाढे अभ्यासक व रसिक समीक्षक

**प्राच्यविद्यापंडित डॉ. म.अ. मेहेंदळेकृत**

# प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती

**निवडक मौलिक लेखांचा संग्रह**

**विभाग : वैदिक संस्कृती**

तत्को वृत्रः
मित्र (वेद) आणि मिथ्र (अवेस्ता)
श्रद्धा
असि-असित आणि भारतातील लोहयुग
सती : काही प्राचीन संदर्भ
*वैदिक संस्कृतीचा विकास* (समीक्षा)
*उपनिषदांचा अभ्यास* (समीक्षा)
प्राप्य वरान् निबोधत

**विभाग : महाभारत**

भारतीय युद्ध – एक पूर्वनियोजित घटना?
भारतीय युद्ध – एक धर्मयुद्ध?
कौरवांचे 'योगेश्वर' कोण?
यत्र योगेश्वरः कृष्णः
मित्रद्रोहे च पातकम्
मुक्तकेशी द्रौपदी
द्रौपदी वस्त्रहरण
नियतीचा दंड
*महाभारताचा उपसंहार* (समीक्षा)

**विभाग : भगवद्गीता**

*गीताई* (समीक्षा)
*गीताप्रवचने* (समीक्षा)
*गीताचिकित्सा* (समीक्षा)

**विभाग : रामायण**

भारतीय युद्ध आणि रामरावण युद्ध – एक तुलनात्मक विवेचन
रामायण : समज आणि गैरसमज

व इतर लेख

*प्रा. मे.पुं. रेगे यांच्या विवेचक प्रस्तावनेसह*

डेमी आकाराची सुमारे ५५० पृष्ठे, पुठ्ठा बांधणी



*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**







अनुक्रमणिका




सर्वधर्म अध्ययन केंद्र
**प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई**

*दुसरी संवर्धित आवृत्ती*

# हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन

**मे.पुं. रेगे**

भारतातील नवसमाजउभारणीचे ध्येय साधण्यासाठी आधारभूत होऊ शकणाऱ्या भारतीय नैतिक-आध्यात्मिक परंपरेचे सुबोध दिग्दर्शन करणाऱ्या ग्रंथाच्या या संवर्धित आवृत्तीत प्रा. शि.स. अंतरकर आणि प्रा. स.ह. देशपांडे यांचे परीक्षण लेख, प्रा. मे.पुं. रेगे यांनी प्रा. अंतरकर यांच्या परीक्षणाचा घेतलेला परामर्श आणि प्रा. स.ह. देशपांडे यांच्या परीक्षणाचा प्रा. रेगे यांच्या विचारव्यूहाच्या संदर्भात श्री. वसंतराव पळशीकर यांनी केलेला उहापोह या नवीन मजकुराचा समावेश आहे. सद्यःस्थितीत अत्यंत प्रस्तुत असलेला हा ग्रंथ आपल्या संग्रही हवाच.

**पृष्ठे २१५ किंमत रु. १६०/-**

*संपर्क :* चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)

अनुक्रमणिका








हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले




